# प्रपंचरहस्य

ह्मणजे

## प्रपंचसंबंधी कांहीं निवडक विचार.

हें पुस्तक

**विनायक कोंडदेव ओक**

ह्यांनीं लिहिलें.




तें

**मुंबईमध्यें**

जावजी दादाजी ह्यांच्या

"निर्णयसागर" छापखान्याचे मालक तुकाराम जावजी

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

सन १८९५.

किंमत १ रुपया.

# प्रपंचरहस्य.

## १.

## स्वरूप.



कितीएक गोष्टी अशा असतात कीं, त्यांची प्रतीति आपणां सर्वांस अगदीं लहानपणापासून आलेली असते, तरी त्यांचें स्वरूप आपणांस कळत नसतें; ह्मणजे त्यांविषयीं निश्चयात्मक असें कांहींएक सांगतां येत नसतें. शिंका, जांभया ह्या आल्या नाहींत, असें एक देखील माणूस सांपडावयाचें नाहीं; परंतु, शिंक येते ह्मणजे शरीरांत काय व्यापार होतो, जांभई येते तेव्हां होतें काय, हें बरोबर रीतीनें, मोठमोठ्या वैद्यांस देखील सांगतां येत नाहीं; मग इतर साधारण लोकांस तें सांगतां येण्याची गोष्ट कशास पाहिजे?

असाच प्रकार प्रपंचाचा आहे. गुहेमध्यें वास करणाऱ्या तपस्व्यापासून तों राजवाड्यांत राहाणाऱ्या सार्वभौमापर्यंत सर्व माणसांच्या मागें कोणत्या ना कोणत्या रूपानें प्रपंच लागला आहे. मागें प्रपंचाचा पाश नाहीं, असा माणूस सांपडावयाचा



नाहीं. तरी, प्रपंच हें काय गूढ आहे, त्याचा आरंभ केव्हां होतो, त्यास उत्तमावस्था केव्हां येते ह्मणावयाची, आणि त्याचें पर्यवसान काय, हें व्यासवाल्मीकीसारख्यांस देखील पूर्णपणें सांगतां आलें नाहीं.

खरोखर, प्रपंच हा एक विलक्षण चमत्कार आहे. हा डोंबाऱ्याच्या झोंपडीपासून तों राजाच्या राजवाड्यापर्यंत सगळ्या राहात्या इमारतींत भरला आहे. हा पांच रुपयांत होतो, दाहा रुपयांत होतो, पन्नास रुपयांत होतो, आणि ह्याला पांच लाख रुपयेही पुरत नाहींत. अशी ह्याची रचना फार विलक्षण आहे. हा दुःखास कारण आहे, असें साधु पुरुष सांगत आले आहेत; आणि तें सांगणें खरें आहे, असें, पावलोपावलीं माणसांच्या अनुभवास येत आहे; तरी, तो सोडण्याचें धैर्य सहसा कोणास होत नाहीं; त्यांतून सुख काढण्याची आशा कोणास चुकवितां येत नाहीं. सर्प समजला आहे, तरी तो कदाचित् आपणांस दंश करणार नाहीं, अशा आशेनें, त्यावर पाय देण्याचा मोहपाश तोडवत नाहीं. ह्याहून मोठा चमत्कार तो कोणता असावयाचा?

मनुष्य असा भ्रांतिष्ट कसा होतो, हा एक फार मोठा प्रश्न आहे. पण थोडा विचार केला ह्मणजे ह्याचा उलगडा होतो. प्रपंच दुःखमूलक आहे, हें माणसास कळतें केव्हां? लहानपणीं कळत नाहीं; तर, प्रपंचांत पडल्यावर मग प्रौढपणीं कळतें. विहिरींत पडल्यावर विहिरींत पडूं नये असें वाटणें, त्यासारखें हें आहे. आणखी दुसरें असें आहे कीं, प्रपंचांत जसें दुःख अतिशयित आहे, तसें कधीं कधीं त्यांत सुखही अप्रतिम होतें, असें ह्मणतात. एका कवीनें ह्मटलें आहे:—

## श्लोक.

सानंदं सदनं सुताश्च सुधियः कांता न दुर्भाषिणी
सन्मित्रं सधनं स्वयोषिति रतिश्चाज्ञापराः सेवकाः
आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिने मिष्टान्नपानं गृहे
साधोः संगमुपासते हि सततं धन्यो गृहस्थाश्रमः.

त्याप्रमाणेंच दुसऱ्या एका कवीनें ह्मटलें आहेः—

यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः
तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम्.

हें कांहीं खोटें नव्हे; खरें आहे. पण तें आपल्या माणसांच्या हातचें कोठें आहे? त्याला पूर्वपुण्य पाहिजे. त्याविषयीं कवींनीं ह्मटलें आहेः—

## श्लोक.

पूर्वदत्ता च या विद्या पूर्वदत्तं च यद्धनम्
पूर्वदत्ता च या भार्या अग्रे धावति धावति.

## ओंव्या.

जाया सुंदर पतिव्रता पुत्र सभाग्य भाविक ज्ञाता
गुरु सर्वज्ञ दयाळ तत्वता पूर्वपुण्यें पाविंजे. १.

कविता रसिक आणि साहित्य परम श्रोता प्रज्ञावंत आणि सप्रेम
सुपंथ आणि सुसमागम पूर्वपुण्यें पाविंजे. २.

शिष्य प्रज्ञावंत सप्रेम उदार वक्ता क्षमावंत सुरस फार
पढला तें समयीं आठवे शास्त्र हें पूर्वपुण्यें पाविंजे. ३.

काया अरोगी सुंदर यजमान सभाग्य उदार
मित्र विश्वासु आणि पवित्र पूर्वपुण्यें पाविंजे. ४.

नृप सत्यपर आणि न्यायवंत अमात्य चतुर आणि पंडित
साधु विरक्त आणि भक्त पूर्वपुण्यें पाविंजे. ५.



**बोलणें सत्य आणि सुरस विद्या आणि विनय विशेष**
**बल आणि क्षमा बहुवस पूर्वपुण्यें पाविजे. ६.**

श्रीधर.

ह्या पूर्वपुण्याचा काय नेम सांगावा? छत्रपति शिवाजी महाराज, ह्यांस संभाजीसारखा दुष्ट पुत्र व्हावा, साध्वी अहल्याबाई ह्यांस माळेरावासारखा दुष्ट पुत्र व्हावा, पीटर धि ग्रेट ह्या थोर पुरुषास आलेक्सिसासारखा दुष्ट पुत्र व्हावा, ह्या पूर्वपुण्यास काय ह्मणावयाचें? ह्मणजे, त्यापुढें उपाय नाहीं.

असें असतां मनुष्यें प्रपंचास धरून कशीं राहातात, हा एक दुसरा प्रश्न आहे. ह्याचें उत्तर असें कीं, ह्या प्रपंचाच्या गाळांत मनुष्य फसत फसत फसतो; एकदम फसत नाहीं. तो असा. आधीं मुळीं तो प्रपंचांत जन्मतो, आणि प्रपंचांत लहानाचा मोठा होतो. त्याला कांहींएक कळत नसतें, तेव्हांच त्याला प्रपंच बिलगतो. आणखी, तो ज्या माणसांत लहानाचा मोठा होतो, तीं सगळीं प्रपंची असतात, नखशिखांत प्रपंचानें भरलेलीं असतात. त्यांचें वळण स्वभावतःच त्याला लागतें, आणि तो त्यांच्यासारखा प्रपंची होतो. आणि त्याला त्यांतलीं लहानसहान सुखें प्राप्त होऊं लागून, त्यांवरून त्याला पुढच्या मोठ्या सुखांची आशा लागते. विद्या झाली ह्मणजे द्रव्यसंपादन; द्रव्यसंपादन झालें ह्मणजे लग्न; लग्न झालें ह्मणजे स्त्रीसुख; पुढें मुलें; मुलांचे सोहळे; पुढें नातोंडें; नातोंडांचे सोहळे; असें जें कोळ्याचें सूत वाढत जातें, तें कांहीं आटपत नाहीं. आणि त्याच्या जाळ्यांत तो सांपडतो. आणि तें जाळें एवढें बळकट असतें कीं, तें त्याला कधींच तोडितां येत नाहीं; आणि त्यांत

त्याला जन्मभर राहावें लागतें. तेथें त्याचा निरुपाय होतो. ह्यालाच माया ह्मणतात.

आणखी, मनुष्याचा साधारण स्वभाव असा आहे कीं, सुखाकडे दृष्टि ठेवावी, आणि दुःख कानामागें टाकावें. धान्य पेरतांना सुबत्ता मनांत आणावयाची, अवर्षण मनांत आणावयाचें नाहीं. ह्या वृत्तीमुळें, तो लहानपणापासून प्रपंचांत रमतो; आणि तो सोडावयाचा—ह्मणजे लहानपणापासून परमार्थज्ञान होईपर्यंत ज्या परिवाराचा सहवास होतो त्यास झटकर तोडावयाचें—हें काम त्याच्यानें करवत नाहीं. ह्यांत कांहीं नवल नाहीं. पांच चार महिने लागलेली संवय सोडण्यास महत्प्रयास पडतात. तेव्हां, बहुतेक जन्म ज्यांत गेला आहे, तो प्रपंच एकदम सोडावयाचा, हें कर्म अत्यंत कठिण आहे—साधारणतः परम दुष्कर आहे—असें ह्मणणें भाग पडतें. रामदासांप्रमाणें "सावधान" ऐकिल्याबरोबर सावध होणें हें अत्यंत दुर्लभ आहे. तेव्हां असें कबूल करावें लागतें कीं, प्रपंच दुःखमूलक आहे, असें समजल्यावरही मनुष्यास तो सोडितां येत नाहीं, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. त्याच्या स्वभावाची साधारण रचनाच तशी केलेली आहे.

ह्मणून, प्रपंच दुःखमूलक आहे ह्यास्तव त्याचा त्याग करावा, असें जे कोणी साधु जनांस सांगतात, ते आपलें कर्तव्य यथार्थ करितात; आणि तो उपदेश ऐकत असतां जन प्रपंचांत राहातात, ते, मनुष्यस्वभावास साधारणपणें जें साहाजिक आहे, तेंच करितात; कमजास्त करीत नाहींत. ह्मणजे, ह्यांत कोणासच नांव ठेवण्यास जागा दिसत नाहीं.

# २.

## प्रपंच नको कां?

श्लोक.

भवाच्या भयें काय भीतोसि लंडी
धरींरे मना धैर्य धाकास सांडीं
रघूनायकासारखा स्वामि शीरीं
नुपेक्षी कदा कोपल्या दंडधारी.

रामदास.



साधुजन प्रपंच नको ह्मणतात, ह्याचें कारण काय असावें, हा एक प्रश्न विचार करण्यासारखा आहे. परमेश्वरानें आपणांस जन्मास घातलें, तेव्हां प्रपंच करण्याचीं साधनें त्यानें आपणांस दिलीं आहेत, ह्यावरून, आपण प्रपंच करावा, अशी त्याची इच्छा आहे, असें दिसतें. तरमग, त्याच्या इच्छेस एकीकडे ठेवून, प्रपंच सोडावा, किंवा मूळींच करूं नये, असें ते कसें सांगतात? ह्याचें उत्तर असें आहे कीं, साधुजनांचें ज्ञान फार मोठें असतें. त्यांस ज्या गोष्टी विचारानें कळतात, त्या इतरांस प्रत्यक्ष अनुभवानेंही कळत नसतात. त्यांस प्रपंचांतलीं सुखदुःखें ज्ञात असतात. आणखी, मनुष्य प्रपंचांत पडला ह्मणजे त्याचें अंतःकरण त्यांतल्या सुखांच्या संपादनाकडे आणि दुःखांच्या निवृत्तीकडे गुंतून, ईश्वरभजनास फार अंतरतें, आणि मोक्षप्राप्ति ह्मणजे सगळ्या जन्माचें सार्थक्य, ती साधण्यास प्रपंच मोठा अंतराय होतो, ह्मणून प्रपंच नको, असें त्यांचें ह्मणणें पडतें. ह्यांत आश्चर्य नाहीं. परमेश्वरभक्तींत त्यांस अप्रतिम सुख

वाटतें, आणि मोक्षाचा मार्ग सांपडतो. आणखी, प्रपंची जन ऐहिक सुखसंपादनार्थ आणि दुःखनिवारणार्थ तळमळत असतात, त्यांस परमेश्वरभक्तीकडे अंतःकरण अर्पिण्यास अवकाश होत नाहीं, आणि ह्यामुळें त्यांस मोक्षप्राप्तीची आशा राहात नाहीं, ही त्यांची विपत्ति आहे, तीवरून त्यांची त्यांस कींव येऊन, ते त्यांस, प्रपंच सोडायास आणि परमेश्वरभजनाकडे लक्ष लावण्यास सांगतात. ही त्यांची मोठी कृपा आहे. प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही साधायाचे नाहींत, असा त्यांचा ग्रह वारंवार दिसून येतोः—

### अभंग.

**प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही**
**एकही निदानीं न घडे त्यासी.** १.
**दोन्ही पेंवांवरी ठेवूं जातां हात**
**शेवटीं अपघात शरीराचा.** २.
**तुका ह्मणे तया दोहींकडे धका**
**शेवटीं तो नरकामाजी पडे.** ३.

तुकाराम.

ह्मणजे, सगळा आग्रह असा कीं, प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही कोणाला साधितां यावयाचे नाहींत. दोहोंतून कांहीं तरी एक साधेल. त्या दोहोंत परमार्थ श्रेष्ठ आहे; जन्माचें सार्थक्य आहे; जन्ममरणापासून मुक्ति त्यांत आहे; ह्मणून तो साधावा, असा आग्रह साधुजन करितात. ठीकच आहे. आपणांस जसा अनुभव येईल, तसा तो जनांस सांगावा, आणि त्याचा हितमार्ग त्यांस दाखवावा, हें महाजनांचें ब्रीदच आहे.



## अभंग.

संसाराचे अंगीं अवघींच व्यसनें
आह्मी या कीर्तनें शुद्ध झालों. १.
आतां हें सोंवळें झालें त्रिभुवन
विषम धुवून सांडीयेलें. २.
ब्रह्मपुरीं वास करणें अखंड
न देखीजे तोंड विटाळाचें. ३.
तुका ह्मणे आह्मां एकांताचा वास
ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा. ४.

तुकाराम.

ही ब्रह्मरसाची अनुपम रुचि महाराजांस सांपडली होती. ती गोडी अन्य जनांस मिळावी, ह्मणून ते त्यांस आपणांसारखे विरक्त होण्याविषयीं बोध करीत असत.

## आर्या.

देती दुःखचि धन सुत दार सदन आप्त जाति सोडून
हें प्रथम विचारावें कीं लाभ अशांस काय जोडून. १.

मोरोपंत.

आणखी रामदासांनीं ह्मटलें आहेः—

मूर्खांमाजी परम मूर्ख जो संसारीं मानी सुख
संसारदुःखा एवढें दुःख आणीक नाहीं.

खरें आहे. प्रपंचांत काळजीची कांचणी मोठी असते. मनुष्य एकाकी असतो, तेव्हां त्याच्या जीवाला काळजी कमी असते—बहुतेक आपणा स्वतः पुरती मात्र असते. परंतु जसा

जसा त्याचा परिवार वाढत जातो, तसतशी ती काळजी वाढत जाते. आज काय, बायकोला ताप आला; उद्यां काय, मुलाचें डोकें दुखूं लागलें; परवां काय, मुलीच्या डोळ्यांत फूल पडलें; तेरवां काय, नातवास गोंवर आला; पुढें काय, पटकीचा उपद्रव होऊन शेजारपाजारचीं माणसें पटापट जाऊं लागलीं; असें चाललेलें असतें. त्यांत वैद्यांचीं आर्जवें करावयाचीं, त्यांस पैसा द्यावयाचा, आजारी माणसांची शुश्रूषा ठेवावयाची, त्यांस औषधपाणी वेळच्यावेळीं मिळे असें करावयाचें, आणखी, तत्संबंधी तापानें जी जळजळ येते ती आंतल्याआंत गिळून जावयाची, ह्या ज्या कांहीं यातना आहेत, त्या अवर्णनीय आहेत. त्या सगळ्या वाहात असतां, मधून मधून निराशेचे प्रहार चाललेले असतात ते वेगळेच. शिवाय, प्रपंच चालविण्यास अत्यंत आवश्यक जें द्रव्य, तें संपादण्याच्या उद्योगांतलीं संकटें असतात, तीं वेगळींच भोगावीं लागतात. ह्मणजे ह्या व्यावृत्तींच्या माळेमध्यें मनुष्य पडून त्यास नेहमीं अस्वस्थता आलेली असते, आणि चैन पडत नसतें. हेंच प्रपंचदुःख; हेंच परमेश्वरभक्तीस अंतरायरूप होतें; ह्मणून, साधुजन हें टाळण्याचा प्रयत्न करितात, आणि तें टाळण्याविषयीं जनांस उपदेश करितात. आणखी, खरोखरच, अशा विपत्तिजाळांत माणूस सांपडला ह्मणजे त्याला पळून जायाला होतें. राजसुख देखील नकोसें वाटतें. पेशवे हिंदुस्थानांत स्वारीस गेले होते, तेव्हां त्यांस बाकी सगळ्या गोष्टी अनुकूल होत्या, परंतु, कर्ज मनस्वी झालें होतें. तेवढ्यावरून ते एकदा ह्मणाले कीं, "मला हा जीव नकोसा झाला आहे!"

दाशरथिराम प्रपंचांत पडला, ह्मणून त्याला वनवासदुःख भोगावें लागलें. एवढा मोठा ज्ञाता धर्मराज, तो प्रपंचाच्या जाळ्यांत सांपडला, ह्मणून त्याला आपल्या आप्तांशीं वैर करून त्यांवर शस्त्र धरावें लागलें. श्रियाळराजा प्रपंचांत गुंतला, ह्मणून त्याला स्वहस्तें स्वपुत्रवध करणें भाग पडलें. हरिश्चंद्र प्रपंचाच्या फेऱ्यांत सांपडला, ह्मणून त्यास आपल्या साध्वी पत्नीचा विक्रय करावा लागला. मनुष्यें जीं अनेक पापें करितात, त्यांतलीं बहुतेक पापें तीं प्रपंचाकरितां करितात. आणखी, जो शोक आणि अश्रुपात आपल्या दृष्टीस पडतो, त्या सगळ्यास कारण बहुधा प्रपंच असतो. असा प्रपंचाचा प्रभाव विचित्र आहे. हा प्रपंच मनुष्याकडून नानाप्रकारचीं विचित्र कर्मे करवितो; ज्याचें तोंड पाहूं नये, त्याच्या पायां पडायास लावितो; ज्यापाशीं अक्षर बोलूं नये, त्याच्यापुढें जी जी करायास लावितो; रडें येत असतां हंसवितो; हंसें येत असतां रडवितो; संताप येत असतां संतोष दाखवायास लावितो; संतोष होत असतां संतापाचें सोंग करणें भाग पाडितो; जें करूं नये तें करवितो; असा जो सर्व मानवसृष्टीचा विलक्षण चालक प्रपंच, त्यास नमस्कार असो !

## ३.

# प्रपंच आणि वैराग्य.




गांतल्या सगळ्या प्रकारच्या सुखाचा विचार करून एका प्राचीन संस्कृत कवीनें ह्मटलें आहे:—

### श्लोक.

भोगे रोगभयं कुले च्युतिभयं वित्ते नृपालाद्भयं
मौने दैन्यभयं बले रिपुभयं रूपे जराया भयम्
शास्त्रे वादभयं गुणे खलभयं काये कृतान्ताद्भयं
सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां वैराग्यमेवाभयम्

ह्मणजे तात्पर्य असें काढिलें आहे कीं, वैराग्य हेंच काय तें निर्भयस्थान आहे. आणि तेंच खरें आहे.

रात्र अंधारी असावी, वाटेंत कांटे खळगे पुष्कळ असावे, आणि चालण्याची त्वरा असावी, अशा स्थितीमध्यें माणसाची जशी अवस्था होते, तशी अवस्था, ह्या जगामध्यें वागण्यांत त्यास भोगावी लागते. ह्या संकटावस्थेमध्यें मनुष्यास विद्या उपयोगीं पडते, असें कोणाकोणास वाटतें. परंतु, ती भ्रांति आहे. गीतेमध्यें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें आहे:—

### श्लोक.

यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः
इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः १.
तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता. २.

ह्मणजे, "अर्जुना, मनुष्य विद्वान असला, आणि फार जपूनही वागत असला, तरी इंद्रियें भारी उचंबळ, तीं त्याचें मन बळेंच ओढून नेतात. त्या इंद्रियांना उत्तमप्रकारें आंवरून मजवरच विश्वास ठेवून, योगेंकरून वागावें. कां कीं, ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत, त्याची बुद्धि स्थिर झाली."

होय. अशी बुद्धि स्थिर होणें हें प्रपंचांतलें वैराग्य होय. वास्तविक पाहिलें असतां प्रपंच आणि वैराग्य हीं दोन व्रतें परस्परांशीं विरुद्ध आहेत. तरमग, प्रपंचांत वैराग्य राहावें कसें, असा प्रश्न सहज उत्पन्न होतो. ह्याचें उत्तर एवढेंच कीं, तत्त्वरूपानें पाहिलें असतां, वैराग्य हें, एका प्रकारें, प्रपंचाचेंच स्वरूप आहे. भावना अगदीं स्वाधीन असणें तें वैराग्य, आणि भावनांच्या स्वाधीन मनुष्यानें होणें हा प्रपंच होय. गीतेंत ह्मटलें आहे:—

**श्लोक.**

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोभिजायते. १.**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति. २.**

ह्मणजे, "जो मनुष्य विषयांचें चिंतन करितो, त्याची त्यांच्या ठायीं आसक्ति उत्पन्न होते, आसक्तीमुळें इच्छा होते, इच्छेला प्रतिबंध झाला ह्मणजे क्रोध उत्पन्न होतो, क्रोधापासून संमोह होतो, ह्मणजे कार्य अकार्य ह्यांचा भेद समजेनासा होतो, संमोहापासून स्मृतीला भ्रंश होतो, भ्रंशापासून बुद्धि नष्ट होते, आणि बुद्धीच्या नाशापासून सर्वस्वाचा नाश होतो."

मनुष्यामध्यें मनोधर्म परमेश्वरानें स्थापित केले आहेत. त्यांचें

समूळ उत्पाटण करणें हें कृत्य अशक्य आहे; किंवा निदान अत्यंत दुष्कर तरी खचीत आहे. ह्याकरितां, त्या मनोधर्मांस अगदीं नाहींसें करण्याचा प्रयत्न करण्याच्या भरीस न पडतां, त्यांची योजना चांगल्या प्रकारें करून—त्यांस नीट मार्गास लावून—त्यांपासून आपणांस उपद्रव होऊं नये असें करणें, हें आपलें काम आहे. षड्रिपु कोणकोणत्या कार्यांकडे योजावे ह्याविषयीं सांगितलें आहेः—

## ओंव्या.

**काम** असावा ईश्वरभजनीं **क्रोध** असावा इंद्रियदमनीं
तीर्थप्रसादशेषग्रहणीं **लोभ** अपार असावा. १.
**मोह** असावा सज्जनाशीं **मद** असावा दुर्जनाशीं
**मत्सर** सदा संसाराशीं असावा तो असे कीं. २.

मुक्तेश्वर.

एका ठिकाणीं एका काळीं एकच वस्तु राहावयाची; एका ठिकाणीं एका काळीं दोन वस्तु कधीं राहावयाच्या नाहींत. त्याप्रमाणें, जीव जो आहे, तो एका काळीं एकाच व्यवधानांत गुंतावयाचा; एकाच काळीं त्यास दोन व्यवधानांत गुंततां यावयाचें नाहीं. ह्मणून, जीवास जर सन्मार्गी, सत्सहवासीं नेहमीं गुंतवून ठेविलें, तर, त्यास असन्मार्गांत न जाऊं देण्याविषयीं वेगळा प्रयत्न करायास नको. मुलास कीर्तनांत नेऊन बसविलें, ह्मणजे त्यास तमाशास जाऊं नको असें सांगायास नको. आणि प्रपंचांतलें वैराग्य तें हेंच आहे. ह्याचें उत्कष्ट उदाहरण आमच्या पुराणांत ह्मटलें ह्मणजे जनकराजाचें आहे. तुकाराममहाराजांचें चरित्र त्या प्रकारचेंच आहे. श्रीधरांनीं ह्मटलें आहेः—

## ओंव्या.

**मिथ्या जैसें मृगजळ, कीं स्वप्नींचें राज्य ढिसाळ**
**अहा प्राणी पापी सकळ, धनधान्य पुत्र इच्छिती. १.**
**गंगेमाजी काष्ठें मिळती, एकवट होती मागुती विघडती**
**तैसीं स्त्रीपुरुषें बोलिजेती, खेळ मुळींच असत्य हा. २.**
**वृक्षावरी पक्षी येती, कितीएक बैसती कितीएक जाती**
**आणिक्या तरुवरी बैसती, अपत्यें तशीं जाणपां. ३.**
**पथिक वृक्षाखालीं बैसत उष्ण सरलिया उठोनि जात**
**सोयरे बंधु आप्त, तैसे जाण निर्धारें. ४.**
**दारा धन आणि पुत्र, यांसीं आसक्त नसावें अणुमात्र**
**अलिप्तपणें संसार, करोनि असक्त असावें. ५.**

ह्या ह्मणण्याचा आशय एवढाच आहे कीं, आपण सगळीं प्रवासी आहों, आणि पृथ्वी ही एक धर्मशाळा आहे. येथें अकस्मात् गांठी पडल्या आहेत. त्यांचा वियोग झाला तर त्याविषयीं दुःख करीत बसूं नये. खरें आहे.

आणखी, दुःखास भिऊन, सगळा प्रपंच टाकून देऊन, वैराग्यधारण करणें—ह्मणजे कुटुंबाचीं माणसें टाकून देऊन उद्योग सोडून आंगाला राख लावून कौपीन घालून एकाद्या गुहेंत जाऊन बसणें, आणि कंदमूलांवर किंवा भिक्षेवर निर्वाह करून दिवस घालवून शेवटीं एकटें मरून जाणें,—हें तरी परमेश्वरास मान्य होईल कीं नाहीं, याविषयीं शंका आहे. एकाद्या चांगल्या मनुष्यानें आपल्या मुलाच्या सुखार्थ घरदार, वतनवाडी, पैकाअडका चांगला जपून ठेविला असतां, त्यांचा उपभोग त्या मुलानें, नीतीनें वागून, नेमस्तपणानें घ्यावा, आणि भला भला ह्मणवून घ्यावें, ह्यानें त्या मनुष्याला जितका

संतोष होईल, तितका संतोष, त्यानें तें सर्वस्व लोकांत वांटून टाकावें, आणि आपण बैरागी होऊन एकाद्या गुहेंत जाऊन बसावें, ह्यानें होणार नाहीं. हाच विचार जगांतल्या प्रपंचाच्या साहित्याच्या संबंधानें समजावा. जगांत प्रपंचाचें साहित्य देवानें ठेविलें आहे, तें उगाच फुकट नासून जाण्यासाठीं ठेविलें नाहीं; त्याचा उपयोग व्हावा, ह्मणून ठेविलें आहे. त्याचा उपयोग यथायोग्य शास्त्रपूत रीतीनें करावा, ह्यांतच देवाला विशेष संतोष आहे. आणि अशा प्रकारें प्रपंचांत राहाणें हें माणसाच्या सुस्थितीस अत्यंत आवश्यक आहे. जगांतून जर प्रपंच नाहींसा झाला, तर, सगळे उद्योग नाहींतसे होतील, सगळ्या कला लयास जातील, दुसऱ्याचें बरें करण्याचें जें सामर्थ्य माणसामध्यें आहे त्याचा उपयोग होण्यास जागा राहावयाची नाहीं, किंबहुना मनुष्याचें मनुष्यत्व कमी होईल. ह्मणून, प्रपंचांत राहून वैराग्यधारण करून कालक्षेप करावा, हेंच माणसास योग्य आहे.

## ४.

## प्रपंच हाच परमार्थ आहे.



साधु सांगतात, परोपकार हेंच महापुण्य आहे; आणि महत्पुण्याचें उत्तम फल तोच परमार्थ आहे. हें जर खरें धरून चालावयाचें आहे, तर, प्रपंचांत जसा परोपकार करायास सांपडतो, तसा परोपकार दुसऱ्या कोणत्याही स्थितींत करायास सांपडत नाहीं; ह्मणून, आह्मी असें ह्मणतों कीं, प्रपंच हाच परमार्थ आहे.

आतां प्रपंचांत परोपकार कसा होतो, तें पाहायाचें. त्यास आधीं प्रथम कर्मफलदृष्टीनें असें पाहिलें पाहिजे कीं, आपण स्वतः खेरीजकरून जितकीं माणसें आहेत, त्या सर्वांची गणना परांत केली पाहिजे. स्वत्व हें केवळ सानिध्यानें प्राप्त होतें; बाकी, ज्याचा तो एकटाच आहे, ह्मणून बाकीचीं सगळीं पर आहेत. ओळखीनें स्वत्व येतें. "वळखिनें अवघें प्रिय मानिती" असें वामनांनीं ह्मटलें आहे. लव आणि कुश हे आधीं अगदीं मोठे शत्रु असे रामचंद्रास वाटत होते. परंतु, ते आपले पुत्र आहेत, असें कळल्याबरोबर प्रेम फुटलें. असो.

आपण खेरीजकरून बाकी सगळे पर आहेत, असें मानिलें ह्मणजे, प्रपंचांत राहून मनुष्य जें कांहीं दुसऱ्यांचें बरें करितो, त्या सगळ्याची गणना परोपकारांत केली पाहिजे. सावकार आपल्या मुलांस संपत्ति मिळवून ठेवितात, राजे आपल्या मुलांस राज्यें मिळवून ठेवितात, मातापितरें आपल्या मुलांस विद्या शिकवितात, हे सगळे परोपकार आहेत. फार काय सांगावें, आई मुलास स्तनपान करविते, हा देखील, त्या अर्थानें,

परोपकारच आहे. परंतु, त्याला परोपकार ह्मणायाचें नाहीं, ह्याचें कारण एवढेंच कीं, त्याच्या मोबदला आपणास कांहीं सुख किंवा संतोष मिळविण्याची इच्छा त्यांत असते. ती इच्छा ज्याच्या बुद्धीं जेथें नसते, तेथें त्याला परोपकार ह्मणण्याचा पाठ जगांत पडला आहे.

साधारणपणें विचार करून पाहिला तर असें दिसतें कीं, परोपकार करायास सामर्थ्य पाहिजे आणि पात्र पाहिजे; नुसत्या सामर्थ्याचा किंवा नुसत्या पात्राचा उपयोग होत नाहीं. वैद्यक उत्तम समजत आहे, जवळ रसायनें तयार आहेत, आणि दुसऱ्यांस फुकट बरें करण्याची इच्छा आहे; पण रोगी नाहीं; तर त्या सामर्थ्याचा काय उपयोग होणार? विद्या विपुल आहे, आणि ती फुकट शिकविण्याची इच्छा पुष्कळ आहे; पण ती शिकण्यास कोणी विद्यार्थी नाहीं; तर त्या सामर्थ्याचा काय उपयोग? अथवा त्याच्या उलट, तींच उदाहरणें घेतलीं, ह्मणजे, रोगी आहे, पण वैद्यक येत नाहीं, तर त्या पात्राचा काय उपयोग? अथवा, शिकायास विद्यार्थी तयार आहेत, पण कोणी शिकवण्यास समर्थ नाहीं, तर त्या विद्यार्थ्यांचा काय उपयोग? सारांश, सामर्थ्य आणि पात्र हीं दोन्ही पाहिजेत. तेव्हां परोपकार होतात. एरव्हीं होत नाहींत. असा सामर्थ्याचा आणि पात्राचा योग जसा प्रपंची माणसास येतो, तसा, वैराग्यशीलास येत नाहीं. वैराग्यशील जो असतो, त्याला दुसऱ्याच्या गरजा भागविण्याचें सामर्थ्य नसतें, त्यापाशीं याचना करायास येतो कोण? आणि येऊन उपयोग काय? जो स्वतः भिक्षेकरी आहे, त्याच्या हातून दुसऱ्यास भीक काय मिळणार? किंवा जो स्वतः भिक्षेवर आपलें उपजीवन करणार, तो दुसऱ्यास भिक्षा काय घालणार?

ह्मणून, वैराग्यशीलाकडे कोणी आपलें दैन्य सहसा भाकीत नाहीं, आणि त्यामुळें त्यास परोपकार करण्यास सहसा कधीं प्रसंग येत नाहीं.

पण प्रपंची माणसाचें तसें नाहीं. कोणीही प्रपंची माणूस घ्या. त्याला थोडाबहुत परोपकार करायाचें सामर्थ्य असतें, आणि परोपकार करण्याचे प्रसंगही त्याला पाहिजेत तितके येतात. आजपर्यंत जगांत जे काय परोपकार झाले आहेत, त्या सर्वांची बेरीज करून जर वांटणी केली, तर, आह्मांला असें वाटतें कीं, वैराग्यशीलांपेक्षां प्रपंची माणसांच्या हातून परोपकार पुष्कळपट अधिक झाले आहेत, असें आढळून येईल. ह्याची जरा विशेष फोड केली पाहिजे.

दोन अगदीं जवळजवळचीं उदाहरणें घेऊं. शिवाजी महाराज आणि रामदास हे दोन्ही पुरुष आपणांस वंद्य आहेत. त्या दोघांचेही हातून महत्कृत्यें पुष्कळ झालीं आहेत. पण, परोपकार कोणाचे हातून अधिक झाले आहेत, हें जर पाहिलें, तर शिवाजी महाराजांचे हातून परोपकार अधिक झाले आहेत, असा हिशेब लागेल. ह्याचें कारण असें आहे कीं, समर्थांपेक्षां श्रीछत्रपतींस परोपकार करण्याचें सामर्थ्यही, एका प्रकारें, अधिक होतें, आणि प्रसंग तर पावलोपावलीं होते. हा महाराष्ट्रदेश मुसलमानांच्या जाचांत बुडाला होता, आणि अगदीं नष्ट होण्याच्या बेतास आला होता, तो त्यांनीं स्वपराक्रमानें वांचविला. हा परोकार लहान झाला काय? तसे समर्थांचे हातूनही महदुपकार झाले आहेत. त्यांच्या सदुपदेशानें सहस्त्रावधि माणसांच्या आत्म्यांस सन्मार्ग मिळाला आहे. ही गोष्ट खरी आहे. परंतु, शिवाजी महाराजांच्या परिश्रमांनीं महाराष्ट्राचें राष्ट्रत्व

कायम राहिलें आहे, ही गोष्ट फारच मोठी आहे. हिंदु धर्मावरची निष्ठा अशीच कायम राहून वृद्धि पावली तर, रामदासांसारखे पुरुष उत्पन्न होण्याची आशा आहे. आणि ह्या आशेस पाया श्रीछत्रपतींचा पराक्रम आहे. पीटर धि ग्रेट ह्या बादशाहानें आपल्या देशांतल्या लोकांस अज्ञानांतून काढून ज्ञानमार्गास लाविलें, हा परोपकार सामान्य झाला काय? आलफ्रेड धि ग्रेट ह्यानें इंग्लंडांतल्या लोकांस अज्ञानांतून काढून ज्ञानसंपन्न केलें. ही राजांची गोष्ट असो. घरांत साधारण प्रतीचे लोक आपल्या मुलांस शिकवितात, ज्ञानमार्गास लावितात, आणि सत्पथगामी करितात, हा परोपकार लहान आहे काय? हा परोपकार करायास वैराग्यशीलांस थारा आहे काय? पांच चार मुलांचे बाप व्हावें, एक दोन भावांचे भाऊ व्हावें, कोणांचे मामा व्हावें, कोणाचे यजमान व्हावें, कोणाचे आश्रयदाते व्हावें, आणि अशा प्रकारें अनेक माणसांच्या उपयोगीं अनेक प्रकारीं पडावें, हें पुण्य सामान्य नाहीं. हें पुण्य वैराग्यशीलांच्या वांट्यास कधीं येत नाहीं. साधूंचा सत्कार करणें, अनाथांस आश्रय देणें, पुण्यवान् पुरुषांचीं दर्शनें घेणें, स्वस्थ चित्तानें परमेश्वरध्यान करणें, हीं जर पुण्यसाधनें आहेत, तर हीं प्रपंचामध्यें, वैराग्यापेक्षां अधिक साधत असतात. नाहीं कोण ह्मणेल? बरें, जर असें खरें आहे, तर, प्रपंच हाच परमार्थ नाहीं काय?

आणखी दुसरा एक पर्याय असा आहे कीं, प्रपंची मनुष्यास पुण्यशीलतेची पेरणी करण्यास पुष्कळ जागा असते. अशी कल्पना करा कीं, एका सत्पुरुषास पांच मुलगे आहेत, आणि त्यांतल्या प्रत्येक मुलास दोन दोन मुलगे आहेत. ह्मणजे, एकंदर पंधरा मंडळी झाली. ह्या पंधरा मंडळीस चांगली विद्या



शिकवून, त्या पुरुषानें सन्मार्गास लाविलें, तर त्यांचें ऐहिक आणि पारलौकिक कल्याण होऊन, त्यांस महापुण्य लागेल; आणि त्या पुण्यास मूळ कारण तो पुरुष होईल. अशा प्रकारचें सत्कृत्य वैराग्यशीलास कधीं साधावयाचें नाहीं. आणखी, ह्यांत परंपरया राष्ट्राचेंही कल्याण आहे. हें वैराग्यशीलास असाध्य आहे.

आणखी दुसरें असें आहे कीं, परमेश्वरानें ज्या सद्वासना माणसांस दिल्या आहेत, त्यांत परोपकारबुद्धि ही एक आहे. तिची तृप्ति करणें ह्यांत एक प्रकारचें अप्रतिम सुख आहे. ही तृप्त करण्यास वैराग्यशाली माणसास जागा सांपडत नाहीं; प्रपंची माणसास पुष्कळ सांपडते. चित्रसाल राजाला बाजीराव साहेबांनीं संकटमुक्त केलें, त्यापासून त्यांना जसा संतोष झाला, तसा संतोष त्यांस सगळ्या कारकीर्दीत दुसऱ्या कशापासूनही झाला नाहीं. हेच बाजीराव जर वैराग्यशील असते—बैरागी असते–तर त्यांस हा प्रसंग साधतां आला असता काय ? खरड्याच्या लढाईनंतर पेशव्यांनीं कितीएक हिंदूंचीं वतनें निजामअल्लीकडून सोडवविलीं, आणि त्याच्या खजीन्यांतून एक कोटि वीस लक्ष रुपये सरकारांत गेलेले त्यांचे त्यांस परत देवविले. हें कृत्य एकाद्या संन्याशास करतां आलें असतें काय ? सारांश, प्रपंच हाच परमार्थ आहे, असें ह्मटल्यास कांहीं हरकत नाहीं.

## ५.

## सुखदुःखाची अस्थिरता.



जगतीतलावर आरंभ आणि अंत हे सर्वांस आहेत. हे जसे सुखास आहेत, तसे दुःखासही आहेत. जसें सुख स्थिर नाहीं, तसें दुःखही स्थिर नाहीं. सुख आणि दुःख ह्यांची सांगड आहे. सुख होऊं लागलें कीं दुःखाची स्वारी मागाहून खचीत येत आहे, असें समजावें. त्याप्रमाणेंच दुःख प्राप्त झालें ह्मणजे, त्याचें निरसन कोणत्या तरी पर्यायानें खचीत होणार आहे, असें समजावें. दिवस गेला कीं रात्र यावयाची; रात्र गेली कीं दिवस यावयाचा; हिंवाळा गेला कीं उन्हाळा यावयाचा; आणि उन्हाळा गेला कीं पावसाळा यावयाचा; हें जसें सृष्टिक्रमाचें राहाटगाडगें ठरलेलें आहे, आणि तें अखंड चाललें आहे, तसें, ह्या प्रपंचांत सुखदुःखाचें गाडें परमेश्वरानें लावून दिलें आहे. आणि सृष्टिक्रमांतील दिवसरात्र, ऋतुक्रम, हीं जशीं माणसास टाळतां येत नाहींत, निमूटपणें भोगावीं लागतात, तशीं प्रपंचांतलीं सुखदुःखें त्याला भोगावीं लागतात. ह्या संबंधानें तो अगदीं पराधीन आहे. त्याच्या हातांत असें कांहींएक नाहीं. ह्याची प्रतीति महानुभवांस प्राचीन काळापासून आलेली आहे, आणि त्याविषयीं ते जनांस बोध करीत आले आहेत. त्या बोधाचें मुख्य तात्पर्य असें आहे कीं, मनुष्यानें सुखानें फुशारूं नये, आणि दुःखानें कष्टी होऊं नये. कां कीं, त्यांत त्याच्या पराक्रमाचा अथवा अपराक्रमाचा कांहींएक संबंध नाहीं. खरें आहे.

आणखी, कालाचा चमत्कार असा आहे कीं, आरंभीं जी वस्तु अत्यंत सुखदायक वाटत असते, ती काळेंकरून तितकी सुखदायक वाटेनाशी होते; साधारण वाटते. आधीं भिकारी असून मग राजे होतात, त्यांस हें चांगलें समजतें. त्याप्रमाणेंच जें दुःख आरंभीं माणसांस दुःसह वाटत असतें, तें, काळेंकरून, आंगवळणी पडल्यामुळें ह्मणा कीं कसें ह्मणा, दुःसह वाटेनासें होतें. त्याची प्रखरता कमी होते; जणूं काय त्या शस्त्राची धार बोंठते. मोठमोठ्या दुःखांविषयीं अवलोन करावें, ह्मणजे ही गोष्ट लक्षांत येते. ही सगळी परमेश्वरी योजना आहे.

सुख मागून मिळत नाहीं, आणि दुःख टाळून टळत नाहीं. सुखदुःखें स्वतंत्र आहेत. तीं यायाचीं तेव्हां यायाचीं, आणि जायाचीं तेव्हां जायाचीं. त्यांजविषयीं हर्षविषाद मानीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तीं निमूटपणें वाहावीं, आणि देवावर भरंवसा ठेवून स्वस्थपणें कालक्रमणा करावी, एवढाच उत्तम मार्ग आहे. एका हिंदुस्थानी कवीनें ह्मटलें आहेः—

## दोहोरे.

सदा न राजा राज्य करेगा
सदा न बाग बहारा
सदा न बुलबुल बागे बोले
सदा न मौज बजारा. १.

राज छोडके राजा चल गै
हटिया छोड पसारी
गुरू छोडके चेला चल गै
दुनयां कोन बिचारी. २.

त्याप्रमाणेंच आमच्या दक्षणी कवीनें ह्मटलें आहेः—

**अभंग.**

**कई वाहावें जीवन कई पलंगीं शयन. १.**
**जैशी जैशी वेळ पडे तैसें तैसें होणें घडे. २.**
**कई भोज्य नानापरी कई कोरड्या भाकरी. ३.**
**कई बैसावें वाहनीं कई पायीं अनवाणी. ४.**
**कई उत्तम प्रावणें कई वसनें तींही जीर्णें. ५.**
**कई सकळ संपत्ति कई भोगणें विपत्ती. ६.**
**कई सज्जनांसीं संग कई दुर्जनांसीं योग. ७.**
**तुका ह्मणे जाण सुखदुःख तें समान. ८.**

तुकाराम.

ह्मणजे, ह्या सगळ्या ह्मणण्याचें तात्पर्य असें आहे कीं, सुख आणि दुःख हीं दोन्ही चिरस्थायी नाहींत, अल्पायुषी आहेत, आणि तीं जुळीं भावंडें आहेत. तीं एकामागें एक असावयाचींच; त्यांत अंतर पडावयाचें नाहीं. आणखी शिवाय तीं अत्यंत आकस्मिक आहेत. तीं केव्हां प्राप्त व्हावयाचीं ह्याचा कांहीं नियम सांगवत नाहीं. सर सालरजंग ह्यांनीं मोठमोठ्या मंडळीस थाटदार मेजवानी देण्याची तयारी आपल्या वाड्यांत केली, आणि त्या उत्सवाच्या वेळीं त्यांस पटकीचा उपद्रव झाला. दुसरे बाजीरावसाहेब, नानाफडणिसांच्या धाकानें, प्रतिबंधांत, फार संकटाचे दिवस मोठ्या क्लेशानें काढीत असतां, आणि गादी प्राप्त होण्याची तिळभरही आशा नसतां, त्यांस पेशवे केल्याची आनंदाची वार्ता एकदम कळली, आणि त्यांस अपूर्व अत्यानंद झाला. चिरंजीव रामचंद्र ह्यास राजपदारूढ पाहाण्याच्या उत्सवांत दशरथ मग्न असतां, त्यास मृत्यु

आला. बडोद्याचे सध्यांचे महाराज सयाजीराव हे अगदीं साधारण स्थितींत असतां, एकाएकीं, त्यांस, इंग्रजसरकारानें बडोद्याचे महाराज बनविलें. सारांश, दुःख हें जसें न बोलावितां येतें, तसें सुखही न बोलावितां येतें. तें ये ह्मटल्यानें येत नाहीं, नको ह्मटल्यानें राहात नाहीं. ह्मणून, ह्मटलें आहेः—

पद.

ज्या ज्या वेळीं जें जें होइल तें तें भोगावें
विवेकाला विसरुनि आपण कष्टी कां व्हावें. ध्रु०
एकदा एक वेळ बहु सुखाची गेली
एकदा एक वेळ जीवा बहु पीडा झाली. ज्या ज्या. १.
एकदा मागूं जातां मिळती षड्रस पक्वान्न
एकदा मागूं जातां न मिळे भाजीचें पान. ज्या ज्या. २.
सुकृत दुष्कृत दोन्ही पूर्वदत्ताचें फळ
ऐसें प्राणी जाणे ना तो मूर्खचि केवळ. ज्या ज्या. ३.
देह दुःखास मूळ ऐसें बरवें जाणोन
सुखदुःखा विरहित रामदास आपण. ज्या ज्या. ४.

रामदास.

असें हें सुखदुःख आळीपाळीनें यावें, आणि तें मनुष्याच्या स्वाधीन असूं नये, हीच व्यवस्था माणसाच्या ऐहिक आणि पारलौकिक कल्याणास आवश्यक आहे. हें असें नसतें, आणि हीं सगळीं सूत्रें माणसाच्या हातीं असतीं, तर, त्याच्या हातून अनेक अनर्थ झाले असते. दुःखाला कोणी शिवता ना, सगळीं माणसें सुखान्ध झालीं असतीं, त्यांस परमेश्वराचें स्मरण झालें नसतें, त्यांच्यामध्यें पापपुण्याचा भेद राहिला नसता, आणि पृथ्वीची स्थिति काय झाली असती, याची कल्पना देखील करतां येत नाहीं.

आणखी, मार्कस आरीलियस ह्यानें असें ह्मटलें आहे कीं, "सर्व कांहीं समजुतीवर आहे. ज्याच्या योगानें मनुष्याची योग्यता कमी होत नाहीं, त्याच्या योगानें त्याच्या जीवाची योग्यता कमी कशी होईल? जगणें, मरणें, मान, अपमान, सुख, दुःख हीं सगळीं जशीं चांगल्या माणसांस प्राप्त होतात, तशीं वाईट माणसांसही प्राप्त होतात. पण, त्यांच्या योगानें माणसांच्या आंगची योग्यता कमजास्त होत नाहीं." साधूंचा अपमान झाल्याच्या गोष्टी आपण वाचतों. पण त्यांवरून त्यांजविषयींची पूज्यबुद्धि कमी होत नाहीं. समर्थांनीं एका शेतकऱ्याच्या हातचा पुष्कळ मार खाल्ला होता, त्यानें त्यांची योग्यता कमी झाली नाहीं. मग त्या अपमानदुःखाला कां भ्यावें?

शिवाय, क्षुधेवांचून अन्नाची रुचि कळत नाहीं, तशी, दुःखावांचून सुखाची किंमत कळत नाहीं. ह्मणून, चांगलें सुख होण्यास दुःख आवश्यक आहे, असें कितीएकांचें ह्मणणें आहे. तें कांहीं खोटें नाहीं. ह्मणूनच ती जोडी देवानें लावून ठेविली आहे. जान बनियन ह्यानें एकदा असें देखील ह्मटलें ह्मणून सांगतात कीं, " जर प्रशस्त असतें, तर मीं देवापाशीं दुःख देखील मागितलें असतें. "

कितीएक साधूंचें ह्मणणें असें आहे कीं, दुःख हें उत्तम अंजन आहे. तें ज्ञानदृष्टि चांगली होण्यास आवश्यक आहे. कितीएक माणसें आपल्या आप्तांच्या मरणावरून देवाकडे वळलीं आहेत. शिवाय केवळ सुख, शुद्ध सुख, दुःखाचा लेश नाहीं असें सुख ह्या जगांत मिळावयाचें नाहीं. बगदादचा राजा अबदुल रहिमान, हा फार मोठा होता. त्याच्या कचेरींत नुसते चोपदार सातशें होते. अडीच कोटि रुपये खर्चून त्यानें आपल्या

राणीचा महाल बांधिला होता. त्यानें स्वहस्तें असें लिहून ठेविलें आहे कीं, "मीं पुष्कळ जय मिळविले आहेत. मजवर माझ्या प्रजेचें प्रेम पुष्कळ आहे. माझे मित्र मला साह्य करण्यास तयार आहेत. सर्व सुखदायक वस्तु माझ्या अर्ध्या वचनांत आहेत. तरी, दुःख नाहीं, चिंता नाहीं, असे निवळ सुखाचे माझे दिवस एकंदर पन्नास वर्षांच्या राजवटींत मीं टिपून ठेविले आहेत, ते सगळे चौदा भरतात. ह्मणून, बाबा मनुष्या, इहलोकीं निवळ सुख मिळविण्याची आशा तूं धरूं नको." समर्थांनीं ह्मटलें आहेः—

श्लोक.

जगीं सर्व सूखी असा कोण आहे
विचारी मना तूंचि शोधोनि पाहें
मना त्वांचिरे पूर्वसंचीत केलें
तयासारिखें भोगणें प्राप्त झालें. १.

ह्मणून ही जी व्यवस्था विधात्यानें लावून दिली आहे, तीस मान्य होऊन, तिच्या अनुरोधानें स्वस्थचित्तेंकरून कालक्रमणा करावी, हा उत्तम मार्ग होय.

# ६.

## पत्नी.



सर्व गात्रांमध्यें जसें शिर हें प्रधान आहे, तशी, प्रपंचाच्या सगळ्या साहित्यामध्यें पत्नी ही प्रधान आहे. प्रपंचामध्यें इतर गोष्टी कितीही उण्या असोत; पण पत्नी जर चांगली आहे—जशी असावी तशी आहे—तर मनुष्य इतर दुःखें विसरतो, आणि त्याला सुख होतें. पत्नी हें पुरुषाचें अर्धें आंग आहे असें आमच्या कवींनीं ह्मटलें आहे, आणि पाश्चिमात्य कवि तिला अर्धें आंग ह्मणून शिवाय उत्तम अर्धें आंग ह्मणतात—तें खरें आहे. आमच्यांत देखील स्त्रीची योग्यता किती मोठी मानतात, ह्याची साक्ष नुसत्या एका शब्दावरून पटण्यासारखी आहे. “कुटुंब” शब्दामध्यें स्त्रीपुरुष, मुलेंबाळें ह्या सगळ्यांचा समावेश होत असतो. तो शब्द एका पत्नीस लावण्याचा संभावित प्रघात आपणांमध्यें आहे. ह्मणजें चमत्कार असा कीं, हा व्यापक बहुमानाचा शब्द घरच्या मुख्य यजमानास लावीत नाहींत, पत्नीस लावितात. स्त्रीच्या संज्ञेंत पुरुषाचा समावेश होतो; पुरुषाच्या संज्ञेनें स्त्रीचा समावेश होत नाहीं. आणखी आमच्या एका संस्कृत प्राचीन कवीनें ह्मटलें आहेः—

**श्लोक.**

**कार्येषु मंत्री करणेषु दासी**<br>
**भोज्येषु माता शयनेषु रम्भा**<br>
**धर्मानुकूला क्षमया धरित्री**<br>
**भार्याच षाड्गुण्यवतीह दुर्लभा. १.**

त्याप्रमाणेंच एका महात्म्यानें आपल्या पत्नीविषयीं ह्मटलें आहे:—

**शरदुत्पलपत्राक्षी शरदुत्पलपुण्यगंधसमगंधा**
**अस्खलित चालवी गृह-धर्मीं मज यष्टि पथिं जशी अंधा. १.**

मोरोपंत.

आणखी प्रपंच हें एक मोठें राज्य आहे. ह्या प्रपंच राज्याचे मुख्य प्रांत दोन; घर आणि बाजार. ह्यांतल्या घर प्रांतावर स्वामित्व पत्नीचें असतें; आणि त्या प्रांतापेक्षां कोट्यवधिपट मोठा प्रांत बाजार आहे, त्यांत प्रवेश मनुष्याचा असतो; स्वत्व किंवा स्वामित्व नसतें; आणि ह्या मोठ्या प्रांतांत नानाप्रकारचे परिश्रम करून, लोकांचीं मनें धरून, प्रसंगीं मानहानि सोसून, जें काय मिळवायाचें, त्याचा उपभोग घेण्याचें खरें आणि पवित्र स्थान ह्मटलें ह्मणजे घर आहे. तेव्हां घर प्रांताची योग्यता केवढी आहे, ती पाहावी. बाजारांत पुष्कळ श्रम करून पुष्कळ मिळविलें—ओझें उचलेना इतकें मिळविलें—त्याचा उपभोग करण्यास जर घर नाहीं, तर त्या संपादनाचा काय उपयोग? शंभर खंडी धान्य उत्पन्न केलें आहे, पण त्यांतले पावशेर तांदूळ शिजवायाला भांडें नाहीं, तर त्या शंभर खंडी धान्याचा काय उपयोग? आणखी घर ह्मणजे नुसती इमारत नव्हे. तर, सुशील पतिव्रतेचा अधिकार उत्तमप्रकारें चालत आहे, असें जें निवासस्थान, तें खरें घर होय. मग तें भव्य मंदिर असो, लहानसें झोंपडें असो, अथवा झाडाखालीं झाडलीफेडलेली जागा असो. तेंच स्थल घर ह्या संज्ञेस योग्य आहे. असें घर ज्यांस आहे, ते धन्य होत.

अशा प्रकारच्या पत्नीची योग्यता फार प्राचीन काळापासून फार मोठी मानीत आले आहेत. आणखी वस्तूची खरी किंमत तिच्या वियोगजन्य दुःखावरून चांगली समजते. इतर साधारण

जन असोत. सीतेच्या वियोगानें दाशरथिराम किती शोकाकुळ झाले होते, तें सर्वांस ठाऊक आहे. मोरोपंतांनीं त्या शोकास आर्यांत गोंविलें आहे:—

**आर्या.**

**हा सीते तुजवांचुनि सर्वहि मज तापहेतु हा सीते**
**हा सीते तूंचि मज व्यसनसमुद्रांत सेतु हा सीते. १.**
**हा सीते हा न जगत्-प्राण खरा वाघ वायु हा सीते**
**हा सीते व्याळचि हा व्यक्त पितो राघवायु हा सीते. २.**
**हा सीते मज देतो त्वन्मुखजित चंद्र ताप हा सीते**
**हा सीते करितो द्विज-राजहि ह्मणवून पाप हा सीते. ३.**
**हा सीते कशि कळली त्वद्व्यसनकथा पिकास हा सीते**
**हा सीते जरि नत मी कशितोचि तथापि कास हा सीते. ४.**
**हा सीते जे त्वत्कच-भारजित-कलाप मोर हा सीते**
**हा सीते ते नाचति मज पाहुनि मजसमोर हा सीते. ५.**

ह्यावरून, एकाद्या साधारण प्रतीच्या माणसास सुशील पत्नीचा वियोग झाला असतां दुःख वाटावें, त्यांत काय आश्चर्य आहे? संपत्तीच्या संबंधानें स्थिति कशीही कमजास्त असो; त्याचा संबंध प्रेमाशीं कांहींएक नाहीं. प्रेम तें प्रेम. तें राजवाड्यांत काय, साधारण घरांत काय, आणि झोंपडींत काय? कोठें नेलें तरी, सोनें तें सोनें. मध कोणत्याही ठिकाणीं असूं द्या. तो गोड असायाचा. तीच गोष्ट खऱ्या प्रेमाची आहे. असो.

ह्या प्रेमाखेरीज आणखी शालाशिक्षण असल्यावांचून त्यापासून व्हावें तितकें सुख होत नाहीं, अशी कल्पना, पाश्चिमात्यांच्या कुटुंबांकडे पाहून आमच्यांतल्या कितीएकांच्या मनांत आली आहे. ती कांहीं सगळी खोटी नाहीं. लेखन, वाचन,

गणित, इतिहास, भूगोल, खगोल, काव्य, गीत, इत्यादि विषय ह्या प्रपंचामध्यें पुष्कळ उपयोगीं पडतात, ही गोष्ट खरी आहे. आणखी आमच्यामध्यें चांगल्या पत्न्या आणि चांगल्या आया तयार होण्यास हे विषय स्त्रियांस यावे, हें आवश्यक आहे. परंतु, हे विषय येत नसल्यानें स्त्रीस प्रपंचामध्यें आपलें कर्तव्य करितां येत नाहीं, ही समजूत, निदान आमच्या सध्याच्या स्थितींत तरी, खोटी आहे. संभावित माहेरीं आणि सासरीं लहानपणीं आमच्या स्त्रियांस, आमच्या रीतीप्रमाणें, गृहशिक्षण मिळतें, तें इतकें उत्तम असतें कीं, आमच्या सध्याच्या स्थितीमध्यें आमच्या कुटुंबांची व्यवस्था उत्तम राहाण्यास आणि त्यांतील माणसांस आनंदानें काल घालविण्यास तें बस होतें. अशीं पुष्कळ उदाहरणें दृष्टीस पडतात. त्याविषयीं फार कोणी विचार करीत नाहींत. परंतु, तीं खरोखर विचार करण्यासारखीं आहेत. आणि तीं नमुना घेण्यासारखीं आहेत. त्यांतल्या एका गरीबशा स्त्रीची हकीकत तिच्या भर्त्यानें तिच्या मरणानंतर लिहून ठेविली आहे. ती आह्मी येथें, होतकरू स्त्रियांच्या उपदेशार्थ, सादर करितों. तिजमध्यें कांहीं विलक्षण माहिती किंवा पराक्रमवर्णन नाहीं. ती अगदीं साधी आहे. तरी, तिजवरून एवढें कळून येईल कीं, विद्या असो कीं नसो, स्त्री जर सुशील आणि नीतिमान आहे, तर, तिचे हातून प्रपंच चांगला होतो. ती हकीकत अशी:—

"ती नेहमीं तृप्त असे. आरंभीं मला दरमहा आठ रुपये मिळूं लागले, ते वाढत वाढत शंभर झाले. तरी, आठ रुपये असतां जसा तिचा संतोष होता, तसाच शंभर असतां होता. त्यांत तिळभरही अंतर पडलें नाहीं. तिचें ह्मणणें असें असे कीं, प्रपंच हा करावा तेवढ्यांत होतो. भाकरीनें पोट भरतें, तसेंच

पंचपक्वान्नांनीं पोट भरतें. त्यास तृप्तीचें तोंडीलावणें असलें ह्मणजे सुख होतें. आणि तें नसलें ह्मणजे लाखों रुपयांच्या प्रपंचांत देखील सुख होत नाहीं."

"सत्य हें तिचें मोठें व्रत असे. सत्यशीलतेनें वागणें हेंच काय तें सदाचरण आहे, हेंच काय तें मोठें पुण्य आहे, अशी तिची निष्ठा फार बळकट होती. ती कधीं असत्याला शिवली नाहीं. ती खरें असे तें सांगे, आणि बोले तें खरें करी. ह्यामुळें अगदीं लहान दोन वर्षांच्या नातोंडापासून तों माझ्यापर्यंत सगळ्या माणसांचा पूर्ण विश्वास तिजवर असे. तिच्या तोंडांतून निघालेल्या शब्दाविषयीं कोणीं संशय घेतला आहे, असें कधीं झालें नाहीं."

"ती प्रामाणिकपणाची मूर्ति होती. तिच्या व्यवहारांत कधीं पडदा नसे. घरांतल्या मोलकरणीपासून तों मजपर्यंत ती सर्वांशीं एकसारखी प्रामाणिकपणानें वागली. प्रपंच साधारण गरीबीचाच होता. तरी, तिनें माझ्या संमतीवांचून कधीं एक पैदेखील खरचिली नाहीं. फार काय सांगावें, प्रत्यक्ष सख्या भावाला एक पैसा देखील तिनें मला विचारिल्यावांचून कधीं उसना दिला नाहीं. तिनें नेहमीं ह्मणावें कीं, मी कांहीं मालकीण नाहीं; मी पाहारेकरीण आहें. माझा अधिकार रक्षण करण्याचा आहे; देण्याचा नाहीं. ही वृत्ति अगदीं आरंभापासून असल्याच्या योगानें, जें काय थोडेंबहुत मला मिळालें, त्याच्या कांहीं अंशाचा चांगला व्यय झाला, आणि बाकीचा अंश संग्रहीं राहिला. फुकट असें कांहींएक गेलें नाहीं."

"ती जुन्या मतांची बायको होती. शाळेंतलें शिक्षण न मिळाल्यामुळें आणि बहुतेक सगळें आयुष्य जुन्या मतांच्या बाय-



कांच्या सहवासांत गेल्यामुळें, तिला आमच्यांतलीं जुनीं मतें चांगलीं वाटत. तरी, समंजसपणाच्या नव्या मतांस ती कधीं विरुद्ध नसे. तिला थोडेंसें वाचतां येत होतें. त्याच्या योगानें आणि नेहमींच्या अनेक चर्चा ऐकून, तिचें मन बरेंच प्रशस्त झालें होतें. विधवांच्या हातून अनेक पातकें घडतात, त्यांपेक्षां त्यांचे विवाह झाले तर बरें, असें ती ह्मणत असे. आणखी तिचा ग्रह असा होता कीं, स्त्रियांची चांगली सुधारणा होण्यास उत्तम आणि खातरीचा उपाय काय तो एकच आहे. तो उपाय हा कीं, त्यांस शाळांत घालून विद्या शिकवावी. ह्मणजे, तिचें ह्मणणें असें पडे कीं, वेड्यावेड्या समजुती सोडण्यास, चांगले परिपाठ चालू करण्यास, आणि पुनर्विवाह करण्यास तरुण स्त्रिया आपण होऊन तयार झाल्या पाहिजेत. रडत राऊत घोड्यावर बसवून उपयोगी नाहीं."

"ती सुनांस मुलींहूनही अधिक ममतेनें वागवीत असे. आपण सासूबाई आहों, कोणी मोठ्या आहों, असा मीपणा तिचे ठायीं नसे. ती सुनांशीं अगदीं सरळ मोकळ्या मनानें, मुलांशीं बोले त्याप्रमाणें बोले, आणि त्या बोलत तें ऐकून घेई. अमकें हें काम तूं करच, असें तिनें सुनेला कधीं सांगितलें नाहीं. सुनांचीं कामें सुनांनीं केलीं तर बरीं; नाहींतर तीं ती आपण करायास लागे. पण ती कधीं रागावली नाहीं. कधीं कधीं तर, आपण काम करीत असावें, आणि सुनांस गोष्टी सांगायास बसवावें, असें ती करी. असें कां करितां, असें तिला कोणीं ह्मटलें, तर तिनें त्यावर उत्तर द्यावें कीं, सुना ह्या दुसऱ्यांच्या मुली, माझ्या येथें माझ्या दैवानें आल्या आहेत, त्यांना संतुष्ट ठेवणें हें माझें—वडील माणसाचें—काम आहे, आणि भूषण

आहे. उद्यां प्रपंच त्यांच्या आंगावर पडला ह्मणजे त्यांना कामें करायाचीं आहेतच; मग न करून काय करतील? मी काम करतें, ह्यांत दोन गोष्टी होतात; त्या सुनांस काम कसें करावें हें कळतें, आणि माझ्या हातून काम होऊन, त्यानें व्यायाम होऊन माझी प्रकृति चांगली राहते. ह्यांत हानि कांहींच नाहीं."

"तिचें बोलणें नेहमीं गोड आणि नम्रतेचें असे. दुसऱ्यास कठिण शब्द बोलावयाचा तिच्या जीवावर येत असे. चाकर माणसांनीं कामाची हयगय केली, किंवा अवज्ञा केली, तरी त्यांस कधीं कठिण शब्द ती बोलली नाहीं. तितकेंच वाईट वाटलें, तर तिनें त्याविषयीं एकांतीं दुःख करावें—रडावें. एक ब्राह्मण तिला स्नानाला पाणी देई तें कधीं अगदीं सोमाळें देई, आणि कधीं अतिशयित कढत आधणासारखें देई, त्यावरून तिला एकदा रडतांना मीं पाहिलें! ती ह्मणे कीं, आपण कधीं कोणाचें मन दुखवूं नये. बोलवलें तर गोड बोलावें, नाहीं तर मुळींच बोलूं नये."

"तिचें आत्मसंयमन फार मोठें होतें. खाण्यापिण्यांत वस्त्रप्रावर्णांत, डागडागिन्यांत ती प्राप्ततृप्त असे. दुपारीं किंवा सायंकाळीं आमचीं सगळ्यांचीं आणि चाकरमाणसांचीं देखील जेवणें झाल्यावर मग तिनें जेवावें. तिचें जेवण दुपारचे बारा वाजल्यावांचून आणि रात्रीचे अकरा वाजल्यावांचून कधीं झालेंच नाहीं. आणि तें देखील, सगळ्यांना पुरून बाकी राही, त्यांतलें थोडेंसें खावयाचें. चोळ्या लुगडीं, डागडागिना, आधीं सुनांना झाल्यावर, सवड असल्यास आपणास मिळावा, अशी तिची इच्छा असे. मुलींनीं आणि सुनांनीं भोगावें, आणि मीं पाहावें, हेंच मला मोठें सुख आहे, असें ती ह्मणत असे."

"ती कधीं एक पळ देखील व्यर्थ जाऊं देत नसे. 'कामावे

तें सामावे' ही तिची ह्मण असे. ती नेहमीं कांहींनाकांहीं तरी उद्योग करीत असे. डाळतांदूळ निवडणें, झाडणेंझुडणें, शिवणें-ओंवणें, मुलांस खाणेंपिणें घालणें, त्यांचे कपडे साफ करणें, वाचणें, नामस्मरण करणें, ह्यांत तिचा सगळा काळ जात असे. ती कधीं रिकामी दृष्टीस पडली नाहीं. ती नेहमीं कांहीं तरी काम करीत असे. आणखी, तिनें ह्याविषयीं नेहमीं आपल्या लहानपणची एक गोष्ट सांगावी. ती अशी कीं, 'माझी आई मला सांगे कीं, तूं काळीसांवळी आहेस, तरी, तूं नेहमीं कांहींतरी चांगलें काम करीत जा, आणि सगळ्यांचें ऐकत जा, ह्मणजे तूं सगळ्यांना आवडशील. तें मीं मनांत धरिलें आहे, आणि तें माझ्या प्रत्ययास आलें आहे.' खरें आहे."

"समाधानवृत्ति हें तिचें मोठें भूषण होतें. तिच्या विहिणीव्याह्यांकडून तिचा पुष्कळ मानपान होत असे. तो, ती घेत असे. पण तो ती त्यांच्या संतोषाकरितां घेत असे; आपल्या हौसेकरितां घेत नसे. तिचें ह्मणणें नेहमीं असें असे कीं, आपल्या हौसा आपल्या घरीं पुराव्या; लोकांवर भार पडून पुरूं नयेत."

"वस्तु पुरविण्याविषयीं आणि वस्तूस जपण्याविषयीं तिची शर्थ होती. चांगलें लुगडें तिनें बाराबारा तेरातेरा वर्षें टिकवावें. आणि दागिने असे जपून वापरावे कीं, ते जसे काय नवे केलेले दिसावे."

"तिला औषधें पुष्कळ ठाऊक होतीं. तीं ती गरीबगुरिबांस फुकट देत असे. त्याबद्दल तिचा दरमहां पांचसात रुपयांचा खर्च असे."

"तिचा ग्रह असा होता कीं, कोणतीही वस्तु व्यर्थ जात नाहीं. ह्मणून ती सगळ्या लहानमोठ्या वस्तूंस फार जपत असे. डाळिंबांच्या साली, आंब्यांच्या साली व कोई, मेणबत्ती तेवल्या-

वर खालीं तिचें मेण सांडतें तें, बारीकसारीक चिरगूटचिंध्या, हीं देखील ती जपून ठेवी, आणि त्यांचा कांहींतरी उपयोग करी."

"ती खरी हिंदु होती. देवावर तिची फार निष्ठा असे. तरी प्रपंचांतल्या कर्तव्यांत तिचें तारतम्य मोठें होतें. 'ऐसें कैसेंरे सोंवळें शिवतां होतसे ओंवळें' ह्यावर तिचा फार विश्वास असे. ती घरांत सोंवळें करी; पण त्यापासून दुसऱ्यास ताप होऊं नये ह्याविषयीं फार जपत असे. तिचें ह्मणणें नेहमीं असें असे कीं, कर्म कोणतेंही असो, त्यापासून दुसऱ्यास ताप होत नसला, ह्मणजे तें देवाला रुजू असतें. ती आपल्या कुटुंबांतल्या माणसांचीं कामें करी, त्यांत कांहीं सोंवळ्याचें कमजास्त झालें तर तिनें ह्मणावें कीं, हेंच माझें सोंवळेंहो; हें देवाला आवडतें."

"भूतदया तिला फार असे. कठोर शब्द ती कधीं कोणालाच बोलली नाहीं. आणि दुसऱ्यांस संकटांत पाहून तिचा जीव फार कळवळत असे. तिचा कोणीएक दूरचा आप्त आहे. त्याचा मुलगा घरांतून रुसून गेला होता. त्याचा पत्ता लागत नव्हता. ह्मणून त्याकरितां तिनें स्वतः कांहीं नवस केला होता. आणखी माझा स्नेही एक मोठा सरकारी कामदार, डोळ्यानें अधू आहे, त्याची तिची पूर्वीची कांहींएक ओळखपाळख नसतां, ती, त्याच्या पत्नीच्या द्वारें, त्याच्या डोळ्यांत औषध घालण्यास त्याजकडे गेली."

"नवसांवर तिचा मोठा भरंवसा असे. ती ह्मणे देवाला कांहीं कमी नाहीं. आपण नवसानें त्याला देतों तें सगळें त्याचेंच असतें. पण, आपण ज्या भक्तीनें तें त्यास अर्पितों, ती भक्ति त्याला प्रिय असते, ह्मणून तो नवसास पावतो. लहान नातोंडानें आपल्या हातांतला साखरेचा खडा आजोबास दिला



ह्मणजे आजोबाला संतोष होतो. कां कीं त्यांत प्रेम दृश्यमान होतें. तसा नवसांचा प्रकार आहे, असें ती ह्मणे."

"ती सगळयांपेक्षां वैधव्यास अतिशयित भीत असे. तिला देवानें दोन मुलगे, एक मुलगी, आणि नातोंडें हीं सगळीं सुशील आणि तिच्या अर्ध्या वचनांत राहाणारीं दिलीं आहेत. आणखी तिला पैशाअडक्याला कांहीं कमी नव्हतें. तरी ती वारंवार असें ह्मणे कीं, हें इतकें देवानें मला दिलें आहे, हा मजवर त्याचा मोठा उपकार आहे. पण, जर माझ्या कपाळीं वैधव्य आलें, तर, देवानें मला कांहींएक सुख दिलें नाहीं, असें होईल; हें सगळें व्यर्थ जाईल."

"तिला अतिशयित वृद्धापकाळ नको होता. ती ह्मणे जितकें जितकें ह्मातारपण अधिक होतें, तितका तितका दुःख होण्याचा संभव अधिक वाढत जातो. आणखी पराधीनपणा येण्याच्या आधीं मरण यावें, हें मोठें भाग्य आहे."

"त्याप्रमाणें तिला नाशिक क्षेत्रीं, माझ्या आधीं, मृत्यूच्या कांहींएक वेदना न होतां, एकाएकीं मरण आलें! अशा प्रकारें त्या भक्तिमान स्त्रीचे मनोरथ भक्तवत्सलानें पुरविले."

ही हकीकत साधी आहे. हींत कांहीं कोणता रस नाहीं. तरी, ही वाचून आमच्या तरुण भाविक कुलस्त्रियांस कांहीं नव्या सूचना मिळतील, आणि थोडें तरी समाधान वाटेल, असा अजमास आहे. आणखी आह्मी असें खातरीनें सांगतों कीं, आमच्यांतल्या होतकरू प्रपंचकर्त्या स्त्रिया जर हिच्या नमुन्याप्रमाणें चालतील, तर, त्यांच्या कुटुंबांतल्या लहानमोठ्या माणसांस त्या प्रिय होतील, कुटुंबांत शांति राहील, आणि परमेश्वरकृपेनें त्यांचा काल आनंदांत जाईल.

## ७.

# मुलें.



प्रपंच्यामध्यें मुलें हें एक फार मोठें भूषण आहे, आणि मोठें सुखही आहे. कितीही गरीबी असो, मुलें नसणें हें फार वाईट वाटतें; मग मुलें नसल्याचा मोठा खेद श्रीमंतांस वाटावा, ह्यांत काय आश्चर्य आहे ? त्यांतही वृद्धापकाळ जवळ येत चालला, ह्मणजे तर मुलांविषयीं इतकी आतुरता प्राप्त होते कीं, तिचें वर्णन करवत नाहीं. ह्याचें कारण असें आहे कीं, आपला वंश वाढलेला पाहाणें हें एक मोठें भाग्य माणसांस स्वभावतःच वाटत असतें. आणखी, मुलांपासून आईबापांस जो कांहीं विशेष आनंद होतो, तो भोगण्याची त्यांस इच्छा असते. ह्याशिवाय, पोटीं पुत्र झाल्यावांचून स्वर्गप्राप्ति व्हावयाची नाहीं, अशी जी एक कल्पना आपणां हिंदूंच्या मनांत भरलेली असते, ती वेगळीच.

आमच्यांत पुत्रप्राप्ति किती आवश्यक मानितात, ह्याचें अनुमान ह्या पुढच्या उताऱ्यावरून लक्षांत येईलः—

### ओंव्या.

**शरीर जैसें प्राणावीण तारुण्यावीण पंचबाण**<br>
**दयेवीण व्यर्थ ज्ञान शांतिवांचून वैराग्य. १.**<br>
**संपत्ति जैशी धर्मैंवीण पंडितावांचून सभासदन**<br>
**कीं रहणीवीण व्यर्थ ज्ञान दीपेंवीण मंदिर जेवीं. २.**<br>
**कीं वेदांतज्ञानावांचून कोरडी व्युत्पत्ति व्यर्थ ज्ञान**<br>
**कीं सत्पात्रावांचून दान कीं स्नेहेंवीण बंधु जैसा. ३.**

**कीं जळेंवीण वापिका कीं नृपावीण नगर देखा**
**कीं नासिकावीण मुखा शोभा जैशी न येची. ४.**
**कीं फळेंवीण तरुवर कीं रामस्मरणावीण मंदिर**
**तसा पुत्रावीण वंश पवित्र सर्वथा पावन नव्हेची. ५.**

श्रीधर.

ह्याहून वेगळा दुसरा एक विचार असा आहे कीं, प्रेम करणें ह्मणून जी एक सद्भावना प्राण्यांच्या ठायीं असते, तिचा उपयोग करण्यास पोटच्या मुलांसारखें उत्तम ठिकाण दुसरें एकही नाहीं. मुलांवर प्रेम करणें हें एकप्रकारचें मोठेपण, आणि भूषण वाटत असतें. माणसांची गोष्ट क्षणभर एकीकडे असो. कोंबडी आपलीं पिल्लें आपणाबरोबर घेऊन हिंडत असते, तेव्हां तिचा डौल पाहावा; अथवा मांजरी आपल्या पिल्लांस जवळ घेऊन त्यांजकडे पाहात असते, तेव्हां तिचा थाट पाहावा; ह्मणजे, त्या दोन्ही प्राण्यांच्या चर्यांवर आह्मी ह्मणतों ह्या भावना अगदीं स्पष्टपणें दृश्यमान होतात. ह्यावरून मुलें असण्यांत कांहीं अप्रतिम सुख आहे, हें सहज समजण्यासारखें आहे.

आईबापांस मुलांचा छंद किती असतो, हें घरोघर दृष्टीस पडतें. अजामिळानें आपल्या मुलास ह्मणावें:—

श्लोक.

**ये ये नारायणारे वद वद वचनें गोड नारायणारे**
**जेवीं नारायणारे क्षुधित तुं असशी आज़ि नारायणारे**
**कोठें नारायणारे त्यजुनि मज नको जाऊं नारायणारे**
**मातें नारायणारे तुजविण न गमे वेळ नारायणारे.**

शिवाय, एका मोंगल बादशाहानें आपल्या पुत्राचें मरण, नवस करून, आपणावर ओढून घेतल्याची गोष्ट सर्वांस ठाऊक आहे.

तात्पर्य सांगावयाचें एवढेंच कीं, मनुष्यांस आणि इतर प्राण्यांस संततिप्रेम पराकाष्ठेचें असतें. आणि मुलांच्या सहवासांत त्यांस कांहीं अप्रतिम सुख होतें.

आणखी दुसरें असें आहे कीं, मुलें असलीं ह्मणजे माणसांस प्रपंच करण्यास आणि संपत्ति मिळविण्यास मोठी उमेद असते. आपल्या मुलांस सुख व्हावें, असें कांहीं तरी आपण करून ठेवावें, ही इच्छा माणसांच्या अंतःकरणांत फार प्रबल असते. आणखी भाईबंदांशीं भांडण्यास जीं अनेक कारणें असतात, त्यांत हें एक कारण मुख्य असतें. चमत्कार असा आहे कीं, माणसांचा ओढा मातापितरांपेक्षां मुलांकडे अधिक असतो. आईबापांचे हाल केल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत; पण, मुलांचे हाल केल्याचीं उदाहरणें कोठें नाहींत. औरंगजेबानें आपल्या बापास कैदेंत घातलें, पण, मरतेवेळीं सगळी संपत्ति मुलांस दिली, आणि चांगल्या रीतीनें वागण्याविषयीं त्यांस चांगला उपदेश केला. लार्ड चेस्टरफील्ड ह्यानें आपल्या मुलास लिहिलें आहेः—"बोलण्याप्रमाणें वाग. तसें न वागणें हें मूर्खपण, अप्रामाणिकपण हा मोठा अपराध आहे. तूं बोलण्याप्रमाणें वागला नाहींस तर तुजवर कोणी विश्वास ठेवणार नाहीं. आणि धर्माच्या आणि नीतीच्या संबंधानें तें मोठें पाप आहे. ज्याचेठायीं सत्य नाहीं, त्याचेठायीं दुसरा कोणताही सद्गुण असावयाचा नाहीं. ह्मणून तूं जें काय एकदां करतों ह्मणशील, तें करायाला चुकूं नको; मग त्यांत तुझें हित साधो अगर न साधो." हा बोध किती उत्तम आहे!! असा बोध खऱ्या प्रेमावांचून तोंडाबाहेर पडेल काय? पडावयाचा नाहीं.



शाहाणपणांत आणि वैभवांत आपल्यापेक्षां अधिक कोणीं होऊं नये, अशी इच्छा माणसांच्या मनांत स्वाभाविक असते; पण, ती गोष्ट त्यांच्या मुलांच्या संबंधानें तशी नसते. आपणापेक्षां आपल्या मुलांचें वैभव अधिक झालेलें पाहून बापास संतोषच वाटतो. ह्यास मनोमन साक्ष आहे.

आणखी, लहान मुलांचा सहवास पित्यास अत्यंत आनंदप्रद होतो. तो इतका कीं, पिता अगदीं वृद्ध असला, तरी, त्याला अगदीं लहान मुलाप्रमाणें क्षणभर होतां येतें. त्यांत अप्रतिम सुख आहे. मुलासारखें बोबडें बोलणें, हें वृद्ध पित्यास किती तरी आवडतें! मुलाला कडेवर किंवा खांद्यावर घेऊन, त्याच्या लालनार्थ, पित्याला हव्यातशा उड्या मारतां येतात; आणि त्याविषयीं त्यास कोणी नांव ठेवीत नाहीं. पण, हातांत मूल नसतां तशा उड्या मारल्या, तर त्याला लागलाच वेडा ह्मणतील. इंग्लंडचा राजा तिसरा जार्ज हा आपल्या दिवाणखान्यांत एके वेळीं आपल्या मुलांशीं घोडा खेळत होता. ह्मणजे तो घोड्यासारखा चार पायांवर उभा राहिला होता, त्याचा एक मुलगा त्यावर स्वार झाला होता, तो घोडा चौपायीं उड्या मारीत होता, आणि तें पाहून त्याचा दुसरा मुलगा त्याला चाबकांनीं हांकून गदगदां हंसत होता. इतक्यांत त्याचा एक प्रधान तेथें आला. त्याजकडे पाहून राजा त्यास ह्मणाला, "या, बसा; तुह्मांला कांहीं मुलें आहेत ना!" असें ह्मणून त्यानें तो खेळ तसाच चालूं दिला.

विचार करण्याची संवय असते, अशा माणसास मुलांच्या स्थितिरीतीच्या अवलोकनानें पुष्कळ चमत्कार दिसतात, आणि त्यावरून त्याला संतोष वाटतो. मुलें कधीं कधीं फार चमत्का-

रिक बोलतात. एक लहान तीनचार वर्षांचा मुलगा तुपाला घट्ट तेल ह्मणतो; शिकरणीला बटाट्यांचें श्रीखंड ह्मणतो; गडव्याला मोठा गडू ह्मणतो; तांदूळ भरायाचे नाहीं ह्मणत, गुंडाळायाचे ह्मणतो; पागोटें बांधायाचें नाहीं ह्मणत, विणायाचें ह्मणतो; असे शब्द त्याला कसे सुचतात, हा एक मोठा चमत्कार आहे. त्याप्रमाणेंच मोठीं माणसें वागतात तसें वागण्याविषयीं त्यांस आपोआप स्फूर्ति कशी होते, आणि समजूं लागल्यावर त्यांत कसकसे फेरफार होतात, ह्याचें अवलोकन करणेंही मोठें आनंदप्रद आहे. कांहीं कांहीं तत्वज्ञानी ह्या स्थितिरीतीवरून, जगांतले सध्याचे व्यवहार कसे वाढले असावे, ह्याचा इतिहास बसवितात. आणखी एका धर्मशास्त्रांत तर अंतःकरणाच्या शुद्धतेविषयीं लहान मुलाचें सादृश्य उत्तम ह्मणून दिलें आहे. आणि तें खरें आहे. लहान मुलांचे परिचय होण्यास मुळींच वेळ लागत नाहीं. भेट झाली कीं मित्रत्व जडतें. ह्यांतलें बीज असें आहे कीं, त्यांच्या अंतःकरणांत, मोठेपण, लहानपण, मानापमान, इत्यादि मनोविकारांचा मुळींच उद्भव झालेला नसतो. नुसतें शुद्ध मनुष्यपण असतें. आणि तें पवित्र असतें. त्याच्या परस्पर संमेलनापासून तात्काळ स्नेह उत्पन्न होतो. अशा प्रकारच्या अनेक गोष्टी आईबापांस पाहाण्यास सांपडतात, आणि त्यांपासून चमत्कार वाटतो.

आणखी, लहान मुलांनीं कांहीं वस्तु मागाव्या, आणि त्या वस्तु पित्यानें त्यांस पुरवाव्या, ह्यामध्यें जो काय एकप्रकारचा संतोष आहे, तो पित्यालाच विचारिला पाहिजे. त्याचा अनुभव निपुत्रिकास कधीं यावयाचा नाहीं. घरांत अठरा विश्वे दरिद्र असतें; खायाचे पदार्थ विकत घेण्याची पंचाईत असते; तरी ग-

रीब आईबापें बाजारांत आपल्या मुलांस लहान लहान खेळणीं विकत घेऊन देत असतात. हा केवढा चमत्कार आहे!

आतां ह्या विषयास दुसरें अंग आहे, तें पाहिलें पाहिजे. मुलांपासून जसें सुख अप्रतिम होतें, तसें दुःखही अनिर्वाच्य होतें. आमची चुलती ह्मणत असे, "बहु बाळ तिला बहु जाळ". घरांत द्रव्य नसावें, आणि मुलांस खायाप्यायास मिळूं नये; असें पाहून आईबापांच्या मनास काय होतें, तें त्यांचें त्यांसच विचारिलें पाहिजे. त्याप्रमाणेंच एकुलता एक मुलगा असावा, आणि त्यास जिवावरचें दुखणें यावें; अशा वेळीं त्याच्या आईबापांच्या मनाची स्थिति कशी होते, ती पाहिली पाहिजे. पुत्रशोकाची गणना महादुःखांत केली आहे. ती यथार्थ आहे. पुत्रशोकासारखें दुःख नाहीं. पुत्रवियोगानें दशरथानें प्राण सोडिला. एडमंड बर्क ह्मणून एक फार मोठा वक्ता आणि तत्वज्ञानी पुरुष इंग्लंडांत होऊन गेला. त्याचा एकुलता एक मुलगा वारला. तेव्हां "ज्यानें मला पोंचवावें, त्याला मी पोंचवितों आं!" असें ह्मणून तो एकाद्या मुलासारखा धाय मोकलून रडला. त्याचें सगळें तत्वज्ञान जागचे जागीं राहिलें!

त्याप्रमाणेंच, मुलगा दुराचारी निघावा, त्यावर नानाप्रकारचे आरोप यावे, आणि त्यास शिक्षा व्हावी; अशा वेळीं काय होतें तें त्यांचें त्यांसच ठाऊक. पीटर धि ग्रेट ह्यानें, आपल्या मुलाच्या दुराचरणास त्रासून त्यास ठार मारविलें ह्मणतात. अहल्याबाई होळकरणीच्या मुलाविषयींही असाच कांहीं आरोप आहे. सारांश, मुलांपासून दुःख होतें, तेंही अप्रतिमच असतें. ह्मणून परमेश्वरापाशीं केवळ पुत्र मागणें बस नाहीं; तर सुपुत्र मागि-

तला पाहिजे. ह्याविषयीं मार्कंडेयाची गोष्ट प्रसिद्धच आहे. एका प्राचीन महात्म्यानें ह्मटलें आहेः—

### श्लोक.

वरं गर्भस्रावो वरमपि च नैवाभिगमनम्
वरं जातप्रेतो वरमपि च कन्यैव जनिता
वरं वन्ध्याभार्या वरमपि च गर्भेषु वसतिः
न चाविद्वान् रूपद्रविणगुणयुक्तोपि तनयः

तसेंच धृतराष्ट्रानें, आपल्या पुत्रांचीं अकर्में आठवून, मोठ्या खेदानें धर्मास ह्मटलें आहेः—

### आर्या.

**अपराध सर्व माझा यास्तव केली तुह्मांस अंजलि हो**
**वंध्यत्व लिहो भाळीं विधिचें कदपत्य न करकंज लिहो.**

मोरोपंत.

एकंदरीमध्यें प्रपंचांत मुलांपासून सुख होतें, तसें दुःखही होतें. त्यांत आपणां माणसांच्या हातीं फारसें नाहीं. सगळें परमेश्वराच्या हातीं आहे. ह्मणून संतति सुशील देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना करावी, एवढेंच काय तें आपणांकडे आहे.



# ८.

## मुलांचें शिक्षण.



मोठ्यांनीं लहानांस शिकवावें, ही परंपराच आहे. मांजऱ्या देखील आपल्या पिलांस उंदीर धरायास शिकवीत असतात.

इतर प्राण्यांमधलें शिक्षण आणि माणसांमधलें शिक्षण ह्यांच्यामध्यें महदंतर आहे. इतर प्राण्यांमधलें शिक्षण जें अनादिकालापासून चाललें आहे, त्यांत कांहीं कमजास्त झालेलें नाहीं, असें दिसतें; आणि माणसांतल्या शिक्षणांत, कालानुरूप, जमीन-अस्मानाचें अंतर पडत चाललें आहे.

कृष्ण, सुदामदेव इत्यादि मंडळी सांदीपिनि ऋषीच्या येथें विद्या शिकली, ती वेगळी; नाना फडणवीस आपल्या गुरूपाशीं विद्या शिकले, ती वेगळी; आपले आजेपणजे विद्या शिकले ती वेगळी; आणि आपण शिकलों आहों, ती वेगळी आहे. हें अंतर विद्येच्या जातींत नाहीं; प्रकारांत आहे; पण तें बरेंच मोठें आहे. आणि तें अंतर कालमाहात्म्यानें पडत गेलें आहे.

नानाफडणवीस ह्यांनीं राज्य चालविलें, तसें सध्या लार्ड रोजबरी हे राज्य चालवीत आहेत. पण ह्या दोघांच्या शिक्षणांत महदंतर आहे.

परंतु, एवढें खरें आहे कीं, विद्या शिकल्यावांचून माणसांचें चालत नाहीं. कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारची विद्या माणसांला आली पाहिजे. आफ्रिका खंडामध्यें कांहीं रानटी लोक आहेत. त्यांच्यामध्यें शिकार करणें हीच काय ती विद्या आहे. ती

परंपरेनें चालते. ह्मणजे, ती मोठ्या माणसांनीं लहान माणसांस शिकवावी, असा परिपाठ त्यांत पडला आहे. अशी विद्या थोडक्यांत आणि सोपी असते, तोंपर्यंत ती, बापास आपल्या मुलांस शिकवितां येते. परंतु, अनुभवानें ती वाढत चालली — ती मोठी झाली — ह्मणजे घरांतल्या मोठ्या माणसांची शिकवण लहानांस पुरेनाशी होते; आणि त्यांस त्या कामाला वेळही पुरेनासा होतो. ह्मणून, मनुष्यांची उन्नति जसजसी वाढत जाते, तसतसा, मुलांस शिकविणें हा एक वेगळा धंदा होतो. आणि तो लोकांत चालूं लागतो.

असा हा शिक्षणाचा धंदा सांप्रत काळीं सगळ्या विद्याचारसंपन्न राष्ट्रांत चालला आहे. आपल्या हिंदुस्थानांतही तो वाढत चालला आहे. शाळा, पाठशाळा, आणि विश्वविद्यालयें ह्यांची संख्या वाढत चालली आहे. त्यांत मुलांच्या संख्या वाढत चालल्या आहेत. आजांस पांढऱ्यावर काळें करितां येत नव्हतें, ते मानसशास्त्राच्या गोष्टी सांगूं लागले आहेत; आणि बापांस नुसती सही करतां येत होती, ते तत्वज्ञानाविषयीं चर्चा करीत आहेत. ही गोष्ट फार आनंदकारक आहे. ही गोष्ट आपणांस आपल्या परमसुज्ञ आणि परोपकारी राज्यकर्त्यांच्या प्रसादानें प्राप्त झाली आहे. हीबद्दल आपण त्यांचे उपकार मानिले पाहिजेत.

ह्या विषयाचा विचार साधारण रीतीनें परस्पर असला ह्मणजे बरें वाटतें. परंतु, आपल्या स्वतःच्या मुलांच्या संबंधानें विचार करूं लागलों, ह्मणजे मन गोंधळून जातें. ह्याचें कारण असें. सध्या विद्या विद्या ह्मणजे काय ती शब्दज्ञानावर आली आहे. आणखी, आमच्या शाळांतल्या विद्यार्थ्यांचा हेतु, सगळ्यांचा



नसला तरी, शेंकडा नव्वदांचा तरी, नौकरी करण्याचा असतो. आणखी, सरकारी कामांत काय आणि इतर कामांत काय, नौकर पाहिजेत आहेत, त्याच्या निदान पांचपट तरी लोक नौकऱ्या पतकरण्यास तयार आहेत. आचारी पांच रुपये दरमाहावर मिळत नाहींत, पण कारकून पांच रुपयांवर पुष्कळ मिळतात. अशी अवस्था प्राप्त झाली आहे, आणि ही अशीच वाढत जाण्याचें चिन्ह दिसत आहे. ह्मणून, विचारशील आईबापांस ही एक मोठी चिंता येऊन पडली आहे कीं, आपल्या मुलांस शिक्षण द्यावें तरी कोणत्या प्रकारचें? त्यांस काय शिकविलें ह्मणजे तें त्यांच्या संभावित रीतीच्या निर्वाहास खचीत खातरीनें उपयोगीं पडेल, हें एक त्यांस मोठें कोडें पडलें आहे.

हें कोडें कांहीं लहान नाहीं. फार मोठें आहे. पंचवीस वर्षांपूर्वी जी विद्या चांगली द्रव्यप्राप्ति होण्यास बस होत होती, ती विद्या सध्या निर्वाहापुरतें अन्नवस्त्र मिळण्यास पुरत नाहीं. आणखी, जी विद्या सध्या देखील पुष्कळ ह्मणून समजतात, ती संपादिली असतांही सोय मिळत नाहीं; कां कीं, तशी विद्या मिळविलेले लोक, चाकरीच्या धंद्यास पाहिजेत आहेत त्यांपेक्षां पुष्कळ तयार झाले आहेत. गरजेपेक्षां पुरवठा मोठा आहे. तेव्हां, वस्तूची सस्ताई व्हावी—तिची किंमत कमी व्हावी—हें अर्थशास्त्राच्या नियमास अनुसरूनच आहे. त्यांत कांहीं विशेष नाहीं. तें सगळें खरें, पण पुढें करावें काय?

ह्याचें उत्तर देणें फार कठिण आहे. ज्यांच्या निर्वाहाची संस्था वडिलोपार्जित आहे, त्यांची गोष्ट क्षणभर एकीकडे असो; आणखी, अशा लोकांची संख्या राष्ट्रांत थोडी असते, ह्मणून त्यांविषयीं फारसा विचार करण्याचें कारणही नाहीं. पण, आपल्या

विद्येवर किंवा आपल्या आंगच्या गुणांवर ज्यांस आपले प्रपंच चालवावे लागतात, असे लोक राष्ट्रांत बहुत असतात, त्यांच्या शिक्षणाच्या क्रमाविषयीं कांहीं चांगली योजना व्हावयास पाहिजे. तीच अडचण आपल्या राष्ट्रास येऊन पडली आहे.

ह्याच्या संबंधानें मुख्य गोष्ट ही कीं, मी आपल्या मुलास पुढें अमक्या धंद्यांत घालीन, अशा उद्देशानें आईबापांनीं, त्या दिशेनें उद्योग करणें, हें कांहीं फलप्रद होत नाहीं. युरोपाच्या इतिहासांत अशीं उदाहरणें अनेक आहेत कीं, आपल्या मुलांनीं पुढें अमुक धंदा करावा ह्मणून त्यांच्या आईबापांनीं प्रयत्न करावा, आणि पुढें मुलांनीं दुसऱ्याच धंद्यांत प्रवीण व्हावें. त्याप्रमाणेंच, पुढें आपणांस अमुक व्हावयाचें आहे, हा निश्चय मुलांवर सोंपून त्यांस आपला विद्योपक्रम स्वेच्छेनुरूप चालवूं देणें, हेंही हितावह होत नाहीं. कां कीं कोणतीही विद्या ह्मटली ह्मणजे तिजमध्यें आधीं पुष्कळ श्रम करावे लागतात. त्यांत तात्कालिक लाभ नसतो. आणि त्यामुळें त्या श्रमांचा तिटकारा मुलांस लवकर येतो. ह्मणून कांहीं दिवस हा अभ्यास कर, कांहीं दिवस तो अभ्यास कर, पुढें तिसराच हातीं घे, त्यानंतर चौथ्यांत पड, असें होतां होतां, एक धड ना भाराभर चिंध्या, असा प्रकार होतो. आणि हा सगळा प्रकार आटोपेपर्यंत मुलगा असतो तो चांगला पुरुष होतो, "पुत्रे मित्र समाचरेत" ही स्थिति येऊन पोंचते. नंतर, मुलगा करतो तें बापास आवडत नाहीं, आणि मुलास एकादी गोष्ट सांगण्याचा वेळ बापास राहात नाहीं. अशी पंचाईत होते. ह्मणून, ह्याविषयीं उत्तम मार्ग हा आहे कीं, मुलास अमक्या धंद्यांत घालावयाचें, असा निश्चय आईबापांनीं करूं नये, आणि शिक्षणोपक्रम मुलांच्या

स्वाधीनही ठेवूं नये. तर, सामान्य शिक्षण— ह्मणजे ज्या शिक्षणाच्या योगानें कोणत्याही व्यवहारांत पडल्यावर त्यांत प्रवीणता मिळविण्यास किंवा काम करण्यास इतरांपेक्षां थोडा वेळ पुरतो असें शिक्षण—देण्याचा निश्चय ठेवावा, आणि तो तडीस नेण्याचा प्रयत्न करावा. युरोपामध्यें बी. ए. पर्यंतच्या शिक्षणास सामान्य शिक्षण ह्मणतात. त्या मानानें, आपले इकडे, सध्या स्वभाषेंत आणि इंग्रजींत चांगलें लिहितां वाचितां येणें, चांगले ग्रंथ समजणें, गणितव्याकरणभूगोलाचें चांगलें ज्ञान असणें, इतक्याचा समावेश करावा.

सामान्य शिक्षण हें एकप्रकारचें बल आहे. तें बल शरीरबलाप्रमाणें मुलांस द्यावें, हें आपलें पहिलें काम आहे. आपण मुलांस खायाप्यायास चांगलें घालून, आणि जपून, त्यांस चांगलीं सुदृढ करितों. तेव्हां, त्या शरीरबलानें त्यांनीं अमुकच कार्य साधावें, असा आपला विचार नसतो. तर त्यांनीं, अपघातापासून आपलें स्वतःचें रक्षण करावें, प्रसंगीं कोणी तुटून पडल्यास त्याचा प्रतिकार त्यांस करितां यावा, आणि एकाद्या ठिकाणीं शक्तीचें काम पडल्यास—प्रसंगीं ओझें उचलण्याचें किंवा मोठी मजल मारण्याचें काम लागल्यास तें—त्यांस सहज करितां यावें, असे विचार आपल्या मनांत असतात. त्याप्रमाणें मुलांस जें शिक्षण द्यावयाचें, त्यानें त्यांस आपलें स्वतःचें रक्षण करितां यावें—ह्मणजे त्यांस दुष्टांस फसवितां येऊं नये, स्वकार्य युक्तिप्रयुक्तीनें साधितां यावें, आणि प्रसंगीं विशेष कार्य करावयाचें असल्यास त्यांत इतरांपेक्षां अधिक गति त्यांची व्हावी—असें शिक्षण द्यावें, ह्मणजे बस आहे. बाकी पुढच्या व्यवसायाचा विचार जो आहे, त्याविषयीं कांहींच निश्चय धरून बसूं नये. ह्मणजे, मुलांस चांगलें

चालायास शिकवावें, आणि जावें कोठें आणि न जावें कोठें हें समजून द्यावें, ह्मणजे मग, तीं आपोआप चांगल्या ठिकाणीं चालत जातील. पण चालतां आलें तर हें सगळें होईल; एरव्हीं व्हावयाचें नाहीं.

जनस्थितीचा विचार केला ह्मणजे असें दिसतें कीं, पाण्याच्या मोठ्या जोराच्या प्रवाहांत पडलेल्या माणसास ज्याप्रमाणें आपला इष्ट मार्ग खातरीनें धरितां येत नाहीं, आणि जसा ओघ येईल तसें वळावें लागतें, त्याप्रमाणें, व्यवसायप्रवाहांत पडलेल्या माणसाची अवस्था होते. आपणांस कितीएक गृहस्थ असे ठाऊक आहेत कीं, त्यांनीं लहानपणीं आणि तरुणपणीं कायद्यांचा अतिशयित अभ्यास करून, मोठमोठ्या परीक्षा देऊन त्यांत पदव्या मिळविल्या, तरी शेवटीं शिक्षकाचें काम करून त्यांस आपला चरितार्थ चालवावा लागला. ह्याच्या उलट, बाळाजीविश्वनाथ हे कारकुनी करण्याच्या बेतानें इकडे उत्तरेस आले, ते पेशवे झाले. लार्ड क्लैव्ह हे प्रथम साधारण कारकून ह्मणून विलायतेहून इकडे आले, ते बंगाल्यांत मोठे योद्धे झाले. सांगायाचा सारांश एवढाच कीं, व्यवसायांचा ओघ जसा सांपडतो, तसा मनुष्य होतो. पण त्यांत एक मुख्य तत्त्व कायम राहातेंच. तें हें कीं, त्यास सामान्य शिक्षण पाहिजे. बाळाजीविश्वनाथांस लिहितां वाचतां येत नसतें, तर ते धनाजी जाधवाकडे कारकून होते ना. तसेंच क्लैव्ह ह्यांस लिहितां वाचतां येत नसतें, तर ते कारकून होऊन बंगाल्यास आले नसते. ह्यावरून असें लक्षांत ठेवावें कीं, व्यवसायप्रवाहांत कांहीं तरी एक गति मिळण्यास मूळ सामान्य शिक्षण लागतेंच; त्यावांचून होत नाहीं; ह्मणून, आपल्या मुलांस सामान्य शिक्षण चांगल्या प्रकारचें देण्याची खबरदारी आईबापांनीं ठेवावी, ह्मणजे





बस आहे. ह्मणजे दुनयेचा व्यवहार ही एक मोठी शर्यत चालली आहे. जीवनार्थ कलह वाढत चालला आहे. ह्या शर्यतीमध्यें जो ज्या मानानें पुढें जाईल, त्यास त्या मानानें सुख होणार आहे. आणि पुढें जाण्यास आधीं अत्यंत आवश्यक ह्मटलें ह्मणजे साधारण बल पाहिजे; त्यास विशेष बलाची भर पडली ह्मणजे कार्य अगदीं सुलभ होतें. पण विशेष बल जें आहे, तें सामान्य बल अंगीं असल्यावांचून प्राप्त होत नाहीं. ह्मणून, सामान्य शिक्षण मुलांस देणें हें आईबापांचें मुख्य कर्तव्य आहे.

ह्या सामान्य शिक्षणाबरोबर एक विशेष गोष्ट मुलांच्या मनांत ठसवायास पाहिजे आहे. ती ही कीं, निर्वाहार्थ कोणताही सरळ मार्गाचा धंदा करणें ह्यांत कांहीं लघुत्व नाहीं. दिवाणाच्या मुलास दिवाणगिरी मिळाली तर ती चांगलीच; तींत कांहीं वाईट नाहीं. पण, दिवाणाच्या मुलांनीं व्यापाराचा किंवा कारागिरीचा धंदा केला, तर त्याच्या योगानें त्यास उणेपण येत नाहीं. नामदार ग्ल्याडस्टन साहेबांचे एक चिरंजीव व्यापारी आहेत, आणि दुसरे धर्मोपदेशक आहेत. चित्रकलाप्रवीण प्रख्यात श्रीमंत रविवर्मा हे एका मोठ्या राजाचे बंधु आहेत. प्रिन्स बिस्मार्क, जर्मनीच्या बादशाहाचे माजी प्रधान, आतां अगदीं वृद्ध झाले आहेत, ते विटांचा व्यापार करितात. परंतु, त्यांस त्याविषयीं कांहीं वाईट वाटत नाहीं. आणि लोकांस त्यांची योग्यता कमी वाटत नाहीं. ही समजूत आमच्या लोकांत आली पाहिजे. ह्मणजे, आमच्या पुढच्या पिढ्यांस, सगळ्या प्रकारच्या चांगल्या धंद्यांचीं द्वारें मोकळीं करून दिलीं पाहिजेत. ह्मणजे चाकरीच्या द्वारांतली गर्दी मो-

डेल, आणि इतर द्वारांत आपला प्रवेश होईल. ही गोष्ट, इतरांपेक्षां, आमच्या ब्राह्मण ज्ञातींत विशेष झाली पाहिजे.

सामान्य शिक्षण देतांना देखील सध्या फार जपायास पाहिजे आहे. तें जपणें ह्मणजे हेंच कीं, त्या शिक्षणाच्या योगानें मुलांच्या ठायीं अतिक्रम येऊं नये; ह्मणजे, मुलांनीं वडील माणसांच्या डोक्यांवर बसूं नये, असें त्यांस वागविलें पाहिजे. आमच्या समाजांतलीं कांहीं आईबापें, आपल्या सुशिक्षित मुलांपेक्षां बरींच अजाण आहेत, ही गोष्ट खरी आहे. तरी, तेवढ्यावरून आईबापांनीं मुलांचें मोठें देव्हारें माजवूं नये; त्यांस आपल्या बरोबरीनें वागूं देऊं नये; त्यांची छाप आपणांवर बसूं देऊं नये; आणि त्यांस आपल्या आज्ञेबाहेर वागूं देऊं नये. हें एक मोठें काम सध्याच्या आमच्या प्रपंचांत करावयाचें आहे. आणि कितीएकांच्या हातून ह्यांत चुक्या झाल्यामुळें—ह्मणजे मुलांचें देव्हारें फार वाढविल्यामुळें—आईबापांस संकटें प्राप्त झालेलीं आह्मीं पाहिलीं आहेत. ह्या कामांत मुलांचा दोष असतो, ही गोष्ट खरी आहे; परंतु, त्या दोषास आरंभ आईबापें करितात. तीं त्यांला चढवितात, ह्मणून तीं चढतात. मुलांस आपल्या स्वाधीन ठेवण्यास एक फार मोठा मुख्य गुण आईबापांत पाहिजे आहे. तो हा कीं, त्यांनीं स्वतः अत्यंत निर्मळरीतीनें आणि तेजस्वितेनें वागावें. त्यांतले कांहीं प्रकार असेः—

१. मुलांवर मुख्य अधिकार आपला असावा.

२. मुलांवर विश्वास ठेवावा; तरी, कामाची देखरेख आपण चांगली करावी.

३. भाषणांत हलकटपणाचे विषय कधीं आणूं नयेत, आणि वाईट शब्द तोंडांतून निघूं देऊं नयेत.



४. प्रसंगीं रागवावें, पण, तो राग त्या कार्यापुरता असावा; त्याचा संबंध दुसरीकडे जाऊं देऊं नये; आणि राग तरी अगदीं थोडा वेळ ठेवावा.

५. आपल्या स्वतःच्या सुखापेक्षां आपल्या मुलांच्या सुखास अधिक जपावें; त्यांचें हित करवेल तितकें करावें; आणखी त्याविषयीं त्यांस प्रमाण पटवावें.

६. ज्ञानाच्या संबंधानें मुलांस आपणापुढें शेखी मिरवूं देऊं नये. आणि त्यांच्या मनांत असें बिंबवावें कीं, आपण शिकलों आहों, हा सगळा काळमहिमा आहे, आणि बाबा शिकले नाहींत, हाही काळमहिमाच आहे; त्यांत कोणाचा मोठा गुणदोष नाहीं.

७. पुस्तकी विद्या ही चांगली आहे, तरी, अनुभवापुढें तिची मातबरी नाहीं—पुस्तकी विद्येपेक्षां अनुभव मोठा आहे—आणि तो अनुभव आपले ठायीं पुष्कळ अधिक आहे, असें आपल्या वर्तनानें मुलांच्या मनांत ठसवावें.

८. आणखी सर्वांत मोठी गोष्ट ही कीं, धर्म, रीतिभाति, मर्यादा, व्यवहार, विद्याभ्यास, परहित, इत्यादिकांत आपण मोठ्या विचारानें, अगत्यानें, आणि तत्परतेनें वागावें. तपोबलानें आपण त्यांच्या पुढें पुष्कळ राहावें. ह्मणजे मुलांस वर्तनाचा नमुना आपल्या वर्तनाचा द्यावा. ह्यालाच आह्मी असें ह्मणतों कीं, आईबापांनीं आपल्या मुलांच्या वर्तनाचे सांचे व्हावें.

ह्या एवढ्या गोष्टी जर आईबापांनीं पाळिल्या, आणि आपल्या मुलांस सामान्य शिक्षण दिलें, तर, त्यांनीं आपलें सगळें कर्तव्य केलें असें होईल. आणि त्यापासून प्रपंचांत सुखाची वृद्धि होईल.

फिलिप राजास शिकंदर हा पुत्र झाला. तेव्हां फिलिपानें राजगुरु आरिस्टाटल ह्यास असें ह्मटलें कीं, "देवानें मला पुत्र दिला आहे, हे तर त्याचे मजवर उपकार आहेतच. पण आपणांसारखे गुरु त्यास शिकवायास असतां तो त्यानें मला दिला आहे, हे त्याचे विशेष उपकार होत." सांप्रतच्या राज्यकर्त्यांविषयीं आमच्या देशांतल्या मुलांच्या आईबापांनीं असेंच ह्मणावें.

आणखी शिक्षणाच्या—विद्येच्या—संबंधानें थोर पुरुषांचे कांहीं विचार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

श्लोक.

मातेव रक्षति पितेव हिते नियुंक्ते<br>
कांतेव चापि रमयत्यपनीय खेदम्<br>
लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिं<br>
किं किं न साधयति कल्पलतेव विद्या.

सुभाषित.

गद्य.

मूर्तिकाराच्या कारागिरीनें दगडांतून जशी सुंदर मूर्ति निघते, तसा, शिक्षणाच्या योगानें माणसांतून पंडित निघतो.

सेनिका.

श्लोक.

न चोराला लाधे प्रगट न दिसे दे सुख सदा<br>
दुणावे कीं देतां किमपि न सरे लेशहि कदा<br>
न कल्पांतीं पावे निधन विद्याभिध असे<br>
असे ज्याचें त्याशीं प्रतिभटति ते पामर पिसे.

वामन.



### गद्य.

वैभवाची इच्छा मनुष्याला आपोआप होत असते. परंतु वैभव संपादण्याचा उपाय शिक्षणाच्या योगानें प्राप्त होतो.

ह्यूज.

### आर्या.

**गुरुपरि उपदेश करी संकटसमयीं उपायही सुचवी**
**इच्छित फल देउनियां कल्पतरूपरि मनोरथा पुरवी.**

थोरले चिपळूणकर.

### गद्य.

तुह्मी जर जनांस विद्या शिकवून त्यांचीं अंतःकरणें उन्नत कराल, तर सगळ्या राष्ट्रावर तुमचे मोठे उपकार होतील. लहानशा घरांत मोठीं माणसें राहात असणें हें, मोठ्या घरांत लहान माणसें राहात असण्यापेक्षां फार चांगलें आहे.

इपिक्टिटस.

आणखी खरोखर राष्ट्रावर अशा प्रकारचे उपकार करणें हें देशांतल्या आईबापांच्या हातीं फार असतें. आईबापें चांगलीं तर मुलें चांगलीं, आणि मुलें चांगलीं तर सगळें राष्ट्र चांगलें. राष्ट्राचें मोठेपण त्याच्या अफाटपणावर नसतें. त्यांतल्या गगनचुंबित पर्वतांवर नसतें. किंवा समुद्रासारख्या नद्यांवर नसतें. तें सारें त्यांतल्या माणसांच्या शिक्षणावर ह्मणजे शाहाणपणावर अवलंबून असतें. नकाशावर नुसत्या आकृति पाहिल्या तर युनैटेड किंग्डम एवढेंसें दिसतें, आणि हिंदुस्थान त्याच्या किती तरी पट मोठें दिसतें. युनैटेड किंग्डमचें क्षेत्रफळ अवघें १२१४८० चौरस मैल आहे, आणि हिंदुस्थानाचें १९८३२७६ चौरस मैल आहे. पण, आज हिंदुस्थान इंग्लंडाच्या स्वाधीन आहे, आकृतीनें

पाहिला तर मनुष्य हत्तीपेक्षां कितीतरी लहान असतो. पण, तो हत्तीच्या गंडस्थलावर बसून त्यास आपल्या आज्ञेंत वागवितो. ह्यावरून सगळें समजावें. नेपोलियन बोनापार्टास एकदा कोणीं विचारिलें कीं, "राष्ट्रास उन्नति कशानें प्राप्त होते?" त्यास त्यानें उत्तर दिलें कीं, "राष्ट्रांत चांगलीं आईबापें असल्यानें." हें उत्तर लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आमच्या राष्ट्रास कशीं माणसें पाहिजेत आहेत, तें आतां बरेंच कळलें आहे. सर्व प्रकारच्या सुधारणेमध्यें धैर्यानें, एकनिष्ठेनें, आणि प्रसंगीं सर्व प्रकारची हानि सोसून, कामें करण्यास सिद्ध, अशा माणसांची फार अपेक्षा आहे. अशीं माणसें केवळ शिक्षणानें—आणि त्यांतही विशेषेंकरून घरच्या शिक्षणानें—तयार होत असतात. ह्मणून तशी प्रजा तयार करणें हें आमच्या राष्ट्रांतल्या आईबापांच्या हातीं आहे. हें काम एका पिढीचें नाहीं. हें पिढ्यानपिढ्या चालावें, तेव्हां पुरें व्हावयाचें आहे. तरी, हें केल्याशिवाय व्हावयाचें नाहीं; केलें पाहिजे; ह्मणून त्यांतलें करवेल तितकें आपण करावें, हें प्रत्येक मातापितरांचें पवित्र कर्तव्य आहे. तें त्यांनीं करावें. त्यांत त्यांचें स्वतांचें आणि परंपरया त्यांच्या राष्ट्राचें कल्याण आहे.

१.

# मित्र.




पंचांत सुख होण्यास जीं साधनें आवश्यक आहेत, त्यांत मित्र हें एक फार मोठें साधन आहे. आणखी स्वभावतःच माणसाला मित्राची मोठी आवड असते. अगदीं लहान मुलें, ह्यांस स्वहिताहित कळत नसतें, तरी त्यांस मित्र आवडतात. मित्र हें मूर्तिमंत साह्य आहे, करमणूक आहे, आणि विसांवा आहे. आणखी असें वाटतें कीं, भक्ति, प्रेम, लोभ, हीं सगळीं मित्रत्वाचीं स्वरूपें आहेत. हीं स्वरूपें व्यवहारांत अनेक संबंधांनीं दृश्यमान होतात, आणि ह्यांपासून महत्कार्यें घडतात.

थोडा विचार करून पाहिला ह्मणजे असें दिसतें कीं, सुदामदेव मोठा संपत्तिमान झाला, रामचंद्रांनीं रावणाचा पराभव केला, पांडवांनीं आपलें राज्य कौरवांपासून परत घेतलें, शिवाजी महाराजांनीं मराठी राज्याची स्थापना केली, जार्ज वाशिंग्टनानें अमेरिकेंतलीं संस्थानें स्वतंत्र केलीं, ह्या सगळ्या महत्कार्यांस दुसरीं कांहीं लहानसहान साधनें असतील, आह्मी नाहीं ह्मणत नाहीं, परंतु, मुख्य साधन मित्रत्व होतें. ह्या महत्कार्यांत जर मित्रत्व इतकें उपयोगीं पडलें आहे, तर तें प्रपंचासारख्या सामान्य कृत्यांतही उपयोगीं पडलें पाहिजे, हें उघड आहे.

साक्रेटीस ह्मणत असे कीं, "माणसांची आवड वेगळी वेगळी असते. कोणास घोडे आवडतात, कोणास कुत्रे आव-

डतात, कोणास द्रव्य आवडतें, आणि कोणास लौकिक आवडतो; पण मला स्वतःला, ह्या सगळ्यांपेक्षां मित्र आवडतात."

सिसरोनें असें ह्मटलें आहे कीं, "इतर गोष्टींविषयीं लोकांचा मतभेद आहे. परंतु, मित्राविषयीं मतभेद नाहीं. पण ह्याविषयीं केवढा चमत्कार आहे तो पाहा. गाड्याघोडे, कपडेचपडे, घरेंदारें, इत्यादिकांपेक्षां मित्राची योग्यता मोठी आहे—ह्या वस्तूंपेक्षां मित्र अधिक सुखदायक होतो—हें जनांस ठाऊक आहे; तथापि त्या वस्तु विकत घेण्यास लोक शेंकडों रुपये खरचितात; पण मित्र—ह्मणजे जिवाचा साह्यकारी—तो मिळविण्याकरितां पैसा खरचिण्याचें त्यांच्या जिवावर येतें!" होय. ही गोष्ट खरी आहे. पण ह्यास कारण आहे, आणि तें सबळ आहे, असें वाटतें. तें कारण हें कीं, ह्या सगळ्या इतर वस्तूंची किंमत ठरवितां येते, आणि त्यांचा क्रयविक्रय करितां येतो, तशी मित्राची किंमत करितां येत नाहीं, आणि त्याचा क्रयविक्रय करितां येत नाहीं. शिवाय, त्या वस्तु एकदा आपल्याशा झाल्या, ह्मणजे त्या आपण सोडूं तोंपर्यंत दुसऱ्याच्या होत नाहींत. तसें मित्रांचें नाहीं. मित्र आपोआप सोडून जातात. ह्मणून त्यांत पैसा खरचिण्याची इच्छा माणसांस होत नाहीं.

आणखी, सिसरो ह्याचें ह्मणणें असें आहे कीं, "आपणांजवळ शेतें, घरेंदारें, शेळ्यामेंढ्या, घोडेबैल हीं किती आहेत, हें माणसास सांगतां येतें; पण आपणांस मित्र किती आहेत, हें एकदम किंवा निखालसपणें सांगतां येत नाहीं." होय, खरें आहे. पण ह्यांत कांहीं नवल नाहीं. कां कीं, अमके अमके हे आपले मित्र आहेत, असें कोणाचेंही ठरलेलें नसतें. आप्त असतात, ओळखीचे असतात, त्या सर्वांस मित्र ह्मणतां येत

नाहीं; आणि खऱ्या मित्रपणाच्या कसोटीस उतरलेलीं अशीं माणसें थोडीं असतात; तरी त्यांविषयींही पुनः संशय येतो. ह्मणजे, मित्र ह्मणायाचें कोणास ह्याचा पक्का निश्चय झालेला नसतो. तेव्हां मित्रांची गणती सांगतां येऊं नये, हें साहजिक आहे. बक्षिसें किंवा भेटी किंवा नजराणे पाठविण्याच्या प्रसंगीं कशी ताणाताण होते, हें सर्वांस ठाऊक आहेच.

आणखी मित्रांच्या संबंधाचा दुसरा एक चमत्कार आहे. मित्र ह्मटले ह्मणजे इतर सर्व माणसांपेक्षां अधिक मोलवान आणि अधिक योग्यतेचे असले पाहिजेत, ह्मणून त्यांची निवड मोठ्या शाहाणपणानें केली पाहिजे, हें खरें आहे. परंतु, तसें होत नाहीं. कुत्रा, बैल, घोडा इत्यादि जनावरांच्या खरेदीच्या वेळेस आपण आधीं त्यांच्या अवलादी पाहातों, आणि त्यांच्या जातींविषयीं शोध करितों; त्याप्रमाणेंच त्यांचे आंगीं काय काय गुण आलेले आहेत, ह्यांची परीक्षा पाहातों; तसें कांहीं मित्रांच्या निवडींत होत नाहीं. मित्र करतेवेळेस आधीं आपण त्यांविषयीं कांहीं शोध करीत नाहीं. प्रसंगानुसार अकस्मात गांठी पडाव्या, आणि कारणपरत्वें ओळख वाढतां वाढतां मित्रत्व बनावें, असें बहुधा होत असतें. ह्यास तरी कारण आहे. तें हें कीं, घोड्याच्या पारखीविषयीं "शालिहोत्र" ह्मणून एक वेगळें शास्त्र आहे, तसें मित्रपरीक्षेचें शास्त्र कोठें नाहीं. आणि तें कधीं सिद्ध व्हावयाचें नाहीं. कां कीं, मनुष्याचा स्वभाव अत्यंत अस्थिर आहे. बिभीषण प्रत्यक्ष भाऊ, तो रावणाच्या शत्रूस वश झाला! ब्रूटस, सीझराचा परममित्र, तो सीझरच्या प्राणघातक्यांत मिळाला ! काय नेम राहिला!

कोणाकोणाचें ह्मणणें असें पडतें कीं, आपले जे मित्र आहेत, ते कदाचित् शत्रु होतील असें समजून त्यांपाशीं सावधगिरीनें वागावें; आणि त्याप्रमाणेंच जे शत्रु आहेत, ते कदाचित् मित्र होतील, असें समजून त्यांशीं वागावें; हें मोठें शाहाणपण आहे. हें सांगणें प्रथमदर्शनीं मोठें खोल आणि चांगलें वाटतें. पण थोडा विचार केला ह्मणजे असा प्रश्न मनांत येतो कीं, जे मित्र आहेत ते कदाचित् शत्रु होतील असें समजून त्यांशीं वागणें–ह्मणजे पडदा ठेवून वागणें–आंत एक बाहेर एक असें वागणें– हें खऱ्या मित्रत्वाचें वागणें होईल काय? होणार नाहीं. ह्मणून तो बोध चांगला नाहीं. आणि त्याच्या पुढचा जो बोध आहे, तो अगदीं निरुपयोगी आहे, असें वाटतें. कां कीं, शत्रु असतात ते मित्र झाल्यावर आपलें हितच करणार आहेत, अहित करावयाचे नाहींत. मग त्यांशीं जपून तें काय वागावयाचें? एका बादशाहानें स्वारीस निघते वेळीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, शत्रु हातीं लागल्यावर ते ठार मारून टाकावयाचे, ठेवावयाचे नाहींत. ते शत्रु शरण आले, आणि त्याच्या आज्ञेंत वागायास तयार झाले; तेव्हां त्या बादशाहानें त्यांस मेजवानी दिली. तेव्हां त्याच्या प्रतिज्ञेचें स्मरण त्यास त्याच्या सेवकांनीं दिलें. तेव्हां तो त्यांस ह्मणाला, "शत्रूंस ठार मारावयाचें होतें; आतां हे शत्रु नाहींत; मित्र आहेत; ह्यांस मेजवानी करावी, हेंच सभ्यपण आहे."

मित्रत्वाचें मूळ आवड आहे. आणि आवड ही अनावर आणि अनियमित आहे. मनुष्य आवडतो तो कांहीं गुणावरून आवडतो. तेवढ्यापुरता तो आपला मित्र होतो. आणखी

अगदीं सगळे गुण आवडतात, असा माणूस कोठें सहसा सांपडत नाहीं, ह्मणून मनुष्यास पूर्ण मित्र असा कधीं मिळत नाहीं. असें जरी आहे, तरी, तेवढ्या तेवढ्या गुणापुरता तो मनुष्य मित्र करून ठेवावा, हें चांगलें आहे. आणखी, सद्गुणांच्या वर्णनानें एक प्रकारचा विशेष आनंद होत असतो, ह्मणून, आपण, गुणांचे भोक्ते व्हावें, दुर्गुण पाहाणारे होऊं नये. ह्मणजे आपणांस, अगदीं पूर्ण नव्हत, पण अर्धेमुर्धे असे अनेक मित्र मिळतात, आणि कोणी शत्रु होत नाहीं. ही साधूंची रीति आहे; ह्मणूनच साधु हे सगळयांचे मित्र—जगन्मित्र—असतात, असें ह्मणतात.

मित्रत्व जोडण्याच्या संबंधानें साधारणपणें लोकांत अशी एक ह्मण आहे कीं, "समानशीलव्यसनेषु सख्यं". ह्मणजे ह्याचा अर्थ असा समजतात कीं, स्वभाव एकसारखे असले ह्मणजे मैत्री जमते. हें एके प्रकारें खरें आहे. एकाच गोष्टीची आवड दोघांस असली, ह्मणजे त्यांचा स्नेह जमतो. गांजेकस—गांजेकसांचा स्नेह तेव्हांच जमतो; तसा, विद्वानविद्वानांचाही स्नेह लवकर जमतो. परंतु, दुसऱ्या एके प्रकारें पाहिलें असतां कांहीं वेगळाच पर्याय आढळतो. स्तुतिप्रिय अशा दोन माणसांचा स्नेह जमत नाहीं. पण, एक स्तुतिप्रिय आणि एक तोंडपुजा ह्यांचा स्नेह लवकर जमतो. ह्मणजे ज्या वस्तूची गरज एकास असते, ती वस्तु दुसऱ्यापाशीं असते; तेव्हां तो स्नेह जमण्यांत कांहीं विशेष चमत्कार नाहीं.

सिसरो ह्यानें ह्मटलें आहेः—"मित्र दूर असले तरी जवळ वाटतात, धनहीन असले तरी श्रीमंत वाटतात, अशक्त असले तरी शक्तिमान वाटतात; फार काय सांगावें, मृत असले तरी

जीवंत वाटतात. माझा मित्र सीपिओ हा मला अद्याप जीवंत आहेसा आणि मजजवळ उभा आहेसा वाटतो. खरोखर माझ्या सुदैवानें मला जें काय प्राप्त झालें आहे, त्यांत, सीपिओच्या मित्रत्वाच्या बरोबरीचें असें दुसरें कांहींएक नाहीं." देह वेगळे, मनें एक, असें जें उत्तम मित्रत्वाचें लक्षण केलें आहे, त्याचें हें उदाहरण आहे.

एकदा मित्र ह्मटला कीं त्याशीं कधीं ताडातोड करूं नये; मग तो वाईट असो कीं चांगला असो. कां कीं, तो वाईट असला, तर प्रथम मैत्री जोडतांना आपली पारख चुकली—आपण मूर्खपणा केला—असा दोष पदरीं घ्यावा लागतो; आणि तो चांगला असला, तर, हातचा मोठा लाभ आपण गमविल्याचा मूर्खपणा माथीं घ्यावा लागतो.

मित्रामध्यें कोणकोणते गुण असावे, हें सांगण्यास प्रत्येक मनुष्य तयार असतो. परंतु, ते गुण आपले ठायीं धरण्यास मनापासून प्रयत्न करणारे असे लोक फारच थोडे असतात. आपले मित्र आपणांस संकटसमयीं साह्य करीत नाहींत, असें पुष्कळ लोक बोलत असतात; परंतु, ते स्वतः आपल्या मित्रांस साह्य करीत नाहींत. "परोपदेशे पांडित्यम्."

साह्य करण्याच्या संबंधानें आपण आपल्या आप्तांपेक्षां आपल्या मित्रांविषयीं फार विशेष अगत्य ठेविलें पाहिजे. ह्याचें कारण असें आहे कीं, आपले आप्त हे स्वाभाविक नात्यानें आपले झालेले असतात; आणि मित्र हे आपण होऊन जोडलेले असतात. आप्त हीं घरचीं माणसें आहेत; आणि मित्र हीं आपण होऊन बोलावून आणिलेलीं माणसें आहेत.

सन्मित्राचें लक्षण सांगितलें आहेः—

**श्लोक.**

**योजी हिताप्रति निवारुनि पापकर्मे**
**वाणी बरेच गुण झांकुनियां कुकर्मे**
**दे आपणास असतां व्यसनीं त्यजीना**
**सन्मित्र-लक्षण असें वदतात जाणा.**

वामन.

**आर्या.**

**मित्र सुखाचा दाता देतो चित्तास नित्य विश्रांती**
**समयीं चित्त भ्रमतां बोध करुनियां निवारितो भ्रांती. १.**
**सन्मित्र करी जें हित कोणाच्यानेंहि तें न करवेल**
**साह्य कराया संकटसमयीं अन्या न धीर धरवेल. २.**

परशुरामपंत तात्या गोडबोले.

असो. तर, सन्मित्र जोडवतील तितके जोडून ठेवावे. त्यांचे दुर्गुणांविषयीं तोंडाबाहेर कधीं एक अक्षर काढूं नये; त्यांच्या गुणांचें वर्णन करावें; त्यांस वारंवार भेटावें; त्यांस घरीं बोलावून त्यांचा आदरसत्कार करावा; त्यांस नजराणे द्यावे; त्यांनीं दिलेलीं बक्षिसें घेऊन त्यांबद्दल त्यांचे आभार मानावे; आणि त्यांस साह्य करायास नेहमीं सिद्ध असावें; एवढेंच आपलें कर्तव्य आहे.

बाकी, पूर्ण मित्र असा काय तो एक आहे. तो परमेश्वर होय. सज्जन जे असतात ते जर कधीं कोणाचें वाईट करीत नाहींत, असें आपण पाहातों, आणि ते देवाचे अंश आहेत असें आपण जाणतों; तर, त्यांच्यापेक्षां कोट्यवधिपटीनें—अनंतपटीनें—श्रेष्ठ जो परमेश्वर तो कधीं कोणाचें वाईट करीत नाहीं, करतो तें कोणाचें झालें तरी चांगलेंच करितो, असा तो आहे. आणि तो

सर्वशक्तिमान आहे. तो आपला मित्र करावा. तो आपला मित्र करायाचा उपाय काय तो एकच आहे; तो हा कीं त्याला आपलें अंतःकरण अर्पण करावें. तें केलें ह्मणजे तो केवळ मित्र होऊन राहात नाहीं.

### श्लोकार्ध.

**नतां करुनि मुक्तही ह्मणसि मी बुडालों ऋणें**
**अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें.**

मोरोपंत.

असा तो भक्तांचा ऋणी होतो. ऋणी होतो, ह्मणजे एका प्रकारें चाकर होतो. तो अन्य व्यापार सोडून भक्तांची चाकरी करितो. अशा कथा बहुतेक सर्व धर्मांच्या पुराणांत आहेत.

### श्लोकार्ध.

**प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी**
**तिहीं अमित काढिल्या नृपमखांत पत्रावळी.**

मोरोपंत.

ह्याच्या पलीकडे आणखी काय सांगावें!

## संपत्ति.



प्रपंच चालायास संपत्ति आवश्यक आहे. पैसा नसला तर प्रपंचांत अतिशयित दुःख होतें.

### कटाव.

त्याचा प्रपंचहीन करंटा
घरांत वाजे नकार घंटा
मुलें भुकेनें करिती तंटा.

अमृतराय.

### श्लोक.

निर्द्रव्या पुरुषा न बंधु भजती त्या मान कोठें नसे
जातां तो धनिच्या गृहा कुशलही त्याला न कोणी पुसे
थोरांपासुनि दूर दूर बसणें लाजोनि वस्त्राविणें
वाटे निर्धनता महानरक हा हा धिक् तयाचें जिणें.

वामन.

### श्लोकार्ध.

कांतेला पति तोचि मान्य हृदयीं जो कां असे जोडका
संपत्तीविण त्यास ती गणितसे जैसा कडू दोडका.

कोणीएक कवि.

### श्लोक.

जोंवरि वित्तोपार्जन करितो तों वरि निजपरिवारहि भजतो
आल्यावर जर्जरता देहीं कोणी न पुसे त्याला गेहीं.

कोणीएक कवि.

हें शब्दशः खरें आहे. पैसा नाहीं ह्मणजे कांहीं नाहीं. पैसा हा प्रपंचाचा जीव आहे. तो पैसा नसला ह्मणजे प्रपंच प्रेता-सारखा वाटतो. ह्मणून प्रयत्न करून पैसा मिळवावा, हें, प्रपंची माणसाचें एक अवश्य कर्तव्य आहे.

हें कर्तव्य करायास कांहीं तरी उद्योग करायास पाहिजे. उद्योगावांचून पैसा मिळत नाहीं. उद्योग करावयाचा ह्याचा अर्थ आपल्या आंगचा गुण विकावयाचा, अथवा गुणाचा उपयोग करावयाचा—असा आहे. न्यायाधीश न्याय करितो, घड्याळें नीट करणारा घड्याळ बरोबर चालेसें करितो, लांकूड-तोड्या लांकडें फोडितो, आचारी स्वैंपाक करितो, तेव्हां ह्या मंडळीस पैसा मिळतो. ह्मणजे, ह्यांस आपल्या आंगचा गुण लोकांच्या उपयोगीं पडेसा करावा लागतो, तेव्हां लोक पैसा देतात. पण, आंगांत गुण असला, तर हें साधायाचें. आंगांत जर गुणच नाहीं, तर लोकांच्या उपयोगीं पडतां येत नाहीं, आणि उपयोगीं पडलें नाहीं, ह्मणजे कोणी पैसा देत नाहीं. ह्मणून, पैसा मिळण्यास आंगांत कांहीं तरी लोकोपयोगी गुण पाहिजे. तो गुण लहानपणीं संपादिलेला असला, ह्मणजे तो जन्मभर उपयोगीं पडतो. आणि तो संपादिलेला नसला ह्मणजे जन्मभर हाल होतात. असो.

जगाचा चमत्कारिक व्यवहार पाहून द्रव्याविषयीं ह्मटलें आहे:—

## श्लोक.

**असे जयाला धन तोचि पंडित**

**कुलीन तो तोचि गुणी बहुश्रुत**

सुशील तो सुंदर तो विचक्षण
धनाश्रयें राहति सर्वही गुण.

वामन.

ही धनाची व्याजस्तुति आहे. गिजनीच्या महमुदाला किंवा दिल्लीच्या औरंगजेबाला, किंवा पुण्याच्या बाजीराव पेशव्याला कधीं कोणीं पंडित किंवा विचक्षण ह्मटलें नाहीं. नुसत्या पैशानें कुलीनपणा येता, तर कितीएक वेश्यांच्या मुली संभावित श्रीमंतांकडे पडल्या असत्या.

प्रपंचास पैसा पाहिजे, ही गोष्ट खरी आहे. परंतु, पैसा असला ह्मणजे प्रपंचांत सुख होतें—सुख होण्यास दुसरें कांहींएक साधन लागत नाहीं—ही कल्पना मात्र खोटी आहे. घरांत पैसा मावत नाहीं, अशीं कितीएक माणसें फार दुःख करितांना आपल्या दृष्टीस पडतात. ह्यावरून एवढें खचीत होतें कीं, नुसत्या पैशानें सुख होत नाहीं.

आणखी पैशाविषयीं असें ह्मटलें आहे कीं, तो मिळवायाचा सोपा असतो, परंतु राखायाचा किंवा त्याचा उपभोग घ्यावयाचा कठिण असतो. हें ह्मणणें खरें आहे. परंतु, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पैसा मिळविणें हा गुण वेगळा आहे, आणि पैशाचा सद्व्यय करणें हा गुण वेगळा आहे. आणि ते दोनही गुण एका माणसाच्याठायीं असतातच, असा कांहीं नेम नाहीं. तरी, त्यांत एवढें खरें आहे कीं, पैसा मिळवायास किती श्रम लागतात, हें मिळवित्यास कळतें, ह्मणून तो त्या पैशाचा खर्च करीत नाहीं— आणि कधींकधीं उपयोगही करीत नाहीं. आणखी, ज्यास पैसा अकस्मात मिळतो, त्यास तो मिळविण्याचीं संकटें ठा-

ऊक नसतात, ह्मणून तो, तो हवा तसा उधळितो, ह्यांत कांहीं विशेष नाहीं. पैसा राखीत बसणें हे मोठे हाल आहेत. आपिशियस ह्मणून कोणीएक मोठा श्रीमंत मिजाशी आणि खादाड पुरुष रोमन लोकांत होऊन गेला. त्यानें आपली बहुतेक दौलत चैनबाजींत उडविली, आणि एकदा पाहूं लागला तो त्याजपाशीं १२०००० रुपये मात्र त्याला शिलक आढळले. तेव्हां त्यास असें भय पडलें कीं, ही एवढीशी रकम आपणास अखेरपर्यंत पुरावयाची नाहीं; ह्मणून त्यानें, विष खाऊन आत्महत्या करून घेतली! तेवढे पैसे सरतपर्यंत तरी बेव्यानें जगायाचें होतें.

पैसा जितका जितका अधिक मिळतो, तितकी तितकी पैशाची हांव अधिक वाढते, असें ह्मणतात हें खरें आहे. आणि ही हांव दुःखास कारण होते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जवळ अमुक इतका पैसा झाला ह्मणजे मनुष्यास आणखीं नकोसा होतो—अमुक पैशानें माणसाची तृप्ति होते—असें अद्याप कोठें आढळलें नाहीं. आणखी, अशी मर्यादा कधीं सांपडावयाची नाहीं. दाहा लाख मिळाले कीं वीस लाखांची इच्छा व्हावयाची, आणि असेंच पुढें चालावयाचें. ह्मणून "अतितृष्णा" करूं नये. मिळववेल तितकें मिळवावें, आणि त्यांत संतुष्ट राहावें. प्रश्नोत्तरमालेमध्यें आहेः—

### आर्या.

**कोण दरिद्री ज्याच्या हृदयीं तृष्णा सदा विशाल वसे**
**धनवान् कोण ह्मणावा जो नर संतुष्टचित्त नित्य असे.**

थोरले चिपळूणकर.

**दारिद्र्य कोण सांगा बहु पुसतों कीं तुह्मां नसे रोष**
**शिष्या बरवें पुशिलें दरिद्रपण तेंच जो असंतोष.**

मोरोपंत.

शिवाय, पैसा जवळ कितीही असो, आपण त्याचे सेवक होऊं नये; तर, तो आपला सेवक आहे, आणि आपण त्याचे यजमान आहोंत, असें समजावें. आपल्या जिवाचे हाल करून पैशाला जपणें, हें पैशाचें सेवक होणें होय. तें करूं नये. पैसा आपला सेवक आहे, असें समजून त्यास आपल्या अडचणी दूर करण्यास लावावें, हें योग्य आहे.

ज्ञान, बल, सौंदर्य, चातुर्य, इत्यादि गुणांविषयीं असें आहे कीं, ह्यांचा उपयोग चांगला केला, ह्मणजे ह्यांपासून सुख होतें; आणि ह्यांचा उपयोग वाईट कामाकडे केला ह्मणजे दुःख होतें. हाच नियम पैशाला लागू आहे. एका साधूनें असें ह्मटलें आहे कीं, "जवळ द्रव्य असल्यामुळें, चांगलीं माणसें वाईट झालीं, अशीं उदाहरणें पुष्कळ आहेत. आणि, दरिद्र असल्याच्या योगानें, देवास भिऊन, चांगल्या रीतीनें वागलेलीं अशीं माणसें त्यांपेक्षां पुष्कळ आहेत." दारिद्य हें साधूंस उत्तम औषध वाटतें. सुदामदेव द्वारकेहून परत येतांना मनांत ह्मणाला:—

### साक्या.

**दरिद्र मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उदंड**
**आतांचेपरि मग न घडेल प्रभुचें स्मरण अखंड. १.**
**यास्तव करुणानिधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें**
**धन न दिलें हें बरवें केलें दीनजनाच्या तातें. २.**

मोरोपंत.

आणखी, पैसा असला ह्मणजे आळस वाढतो, आणि दुर्गुणांची वृद्धि होते, हें मनांत आणून, सध्याचे नामांकित तत्व-

वेत्ते हर्बर्टस्पेन्सर असें लिहितात कीं, "मनुष्यानें[1] आपल्या मुलांसाठीं त्यांस श्रम करण्याची आवश्यकता लागणार नाहीं, इतकें द्रव्य संपादन करून ठेवणें चांगलें नाहीं."

आणखी, सोनें हें लोखंडापेक्षां अधिक मोलवान आहे, तें कोठपर्यंत? जिकडेतिकडे शांतता आहे, आणि सगळे कारभार स्वस्थपणें चालले आहेत, तोंपर्यंत. असा काळ जाऊन ह्याच्या उलट स्थिति प्राप्त झाली, ह्मणजे हें सगळें बदलतें. सोलन ह्या तत्त्ववेत्त्यास क्रीसस राजानें आपली अपार संपत्ति दाखविली. तेव्हां ती पाहून तो तत्त्ववेत्ता त्यास ह्मणाला, "महाराज, आपणांपाशीं सोनें आहे, त्यापेक्षां चांगलें लोखंड ज्यापाशीं आहे, असा राजा आपणांवर चालून आला ह्मणजे हें आपलें सगळें सोनें त्याचें होईल. तेथें आपल्या सोन्याचें मोठेपण चालावयाचें नाहीं." उघडच आहे. लोखंडाचीच गोष्ट कशास पाहिजे. शाहाणपण अधिक असतें, तिकडे संपत्ति धांव घेते. आमच्या ह्या हिंदुस्थानाकडेस पाहा, आणि विचार करा, ह्मणजे ह्याची सत्यता लक्षांत येईल. बलप्रभाव आहे.

कोणीएक पाश्चिमात्य कवि असें ह्मणतो कीं, "मला पैसा मिळावा, असें मला फार वाटतें. कां कीं, द्रव्याचा चांगला उपयोग कसा करावा, हें मला ठाऊक आहे. द्रव्याच्या योगानें दुसऱ्यांचे श्रम विकत घेतां येतात, आणि तद्द्वारा विश्रांति भोगतां येते. आणि त्या विश्रांतीचा उपयोग जनाच्या हिताकडे लावण्याचें सामर्थ्य ज्यांस आहे, त्यांस द्रव्य देणें, हा त्याचा उत्तम सद्व्यय आहे." खरें आहे. ज्यांस द्रव्याचा उपयोग चां-

१ रा. फडकेकृत भाषांतर.

गला करितां येत नाहीं, त्यांस मुळींच द्रव्य न मिळावें, हें बरें. ह्मटलें आहेः—

श्लोक.

द्रव्यास हे गमनमार्ग यथावकाश
कीं दान भोग अथवा तिसरा विनाश
जो घे न भोग जरि पात्रकरीं न देही
त्याच्या धनास मग केवळ नाश पाहीं.

वामन.

युरिपिडीज ह्मणून एक विद्वान होऊन गेला, तो ह्मणत असे कीं, "पैसा असला ह्मणजे मित्र मिळतात." होय. "ओयरा तिकडे सोयरा." आणखी, अमृतरायांनीं ह्मटलें आहेः—

पद.

बा तुझा चालता काळ खायाला मिळती सकळ. ध्रु०
हे कोण बायकोचे साले तुपावेगळा घांस न गिळे
तांदुळ रांधावे मोकळे केलें बेबीचें ऊखळ. बा तु० १.
हे कोण बायकोचे मामे घरांत हिंडती रिकामे
साकरशेलियांचे जामे भोजनभाऊ केवळ. बा तु० २.
साल्या मेहुण्या घरा येती फराळाच्या पंक्ति बैसती
नातें कोरकोरुन काढिती अवघा मायेचा खेळ. बा तु० ३.
अमृतराय ह्मणे रे मूर्खा नको भुलूं मायेच्या सुखा
अंतीं एकटा जाशी नरका भजें सद्गुरु दयाळा. बा तु० ४.

पण सगळींच माणसें अशीं नसतात. त्यांत कांहीं खरीं सोयरीं आणि खरीं आप्त असतात. तीं विपत्ति प्राप्त झाली तरी

सोडीत नाहींत. अशीं माणसें ओळखावीं, आणि त्यांचेसाठीं झीज सोसावी. बाकी, उगाच गाबाळ भोंवता जमवून पोसणें हें व्यर्थ आहे.

पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, कितीही संपत्ति मिळाली तरी तृप्ति नसते. हें फार वाईट आहे. तृप्तीवांचून सुख नाहीं. किंबहुना तृप्ति हेंच सुख आहे. आणि तृप्ति ही आपल्या मनावर आहे. साक्रेटिसाची सगळी दौलत एकशें वीस रुपयांची होती, तरी तो तृप्त होता; आणि सुलतान महमुदापाशीं खंडोगणती सोनें होतें, तरी त्यास कधीं तृप्ति प्राप्त झाली नाहीं.

ह्मणून सत्यमार्गानें वागून मिळववेल तितकें द्रव्य मिळवावें, आणि मोठ्या बातबेतानें त्याचा खर्च करावा. ह्याविषयीं लार्डबेकन ह्यानें दोन शब्दांत ह्मटलें आहे कीं, "पैशाचा उपयोग खर्च करणें हा आहे; तें खर्च करणें सन्मानार्थ आणि सत्कृत्यार्थ असावें, ह्मणजे झालें."

संपत्तीपेक्षां ज्ञान श्रेष्ठ असतां, ज्ञानवान लोक संपत्तिवानांच्या घरीं घिरट्या घालीत असतात, पण संपत्तिवान लोक ज्ञानवानांच्या घरीं जात नाहींत, ह्याचें कारण काय, असा प्रश्न कोणा एकानें एका ज्ञानवानास केला. त्याचें उत्तर त्यानें असें दिलें कीं, "ज्ञानवानांस संपत्तीची किंमत कळत असते, आणि संपत्तिवानांस ज्ञानाची किंमत कळत नसते, ह्मणून असें होतें."

आणखी, संपत्तीनें उन्मत्त होऊं नये. संपत्ति हें केवळ देवाचें देणें आहे. त्यांत माणसाच्या पराक्रमाचें कांहीं नाहीं. ह्यास मोठी साक्ष हीच कीं, पृथ्वीवर कितीएक चांगलीं शाहाणीं

माणसें अन्न अन्न करीत भटकत आहेत, आणि त्यांच्यापेक्षां पुष्कळ कमी योग्यतेचीं माणसें संपत्तींत लोळत आहेत. ह्मणूनच कवींनीं ह्मटलें आहे:—

**अभंग.**

देह हें देवाचें वित्त कुबेराचें
तेथें ह्या जीवाचें काय आहे.

रामदास.

हें लक्षांत ठेवून प्रपंचांत वागावें हा उत्तम मार्ग आहे.

# ११.

## सृष्टिशास्त्राचें अवलोकन.



एकाद्या दूर देशाहून एकादें पत्र यावें; तें कठिण असावें; फारसें कोणाला लागूं नये; त्यांत एकाद्याला तें पुष्कळ वाचतां आलें, ह्मणजे लोक त्याची वाहवा करितात. ह्या मानानें पाहिलें असतां, सृष्टि हें देवकृत महापुस्तक आहे, हें वाचावें ह्मणून उघडून ठेविलें आहे. हें वाचणें फार कठिण आहे; हें जे कोणी बरेंच वाचितात–ह्मणजे ह्यांतले चमत्कार जे कोणी बरेच हुडकून काढितात–त्यांस पुष्कळ शाबास ह्मटलें पाहिजे, हें उघड आहे. आणि हें ईश्वरकृत पुस्तक वाचण्यांत जो काय आनंद आहे, तो अप्रतिम आहे. आणि प्रपंचामध्यें, थोडी सवड करून ज्यांस अशा प्रकारचा अल्पस्वल्प तरी आनंद संपादितां येतो, ते प्रपंचांतल्या दुःखांची परवा करीत नाहींत. ह्यालाच ब्रह्मानंद ह्मणावें, हें बरें दिसतें.

कोणा एका तत्त्वज्ञान्याला प्रत्यक्षप्रमाणानें एवढें कळलें होतें कीं, काटकोन त्रिकोणांत कर्णाचा वर्ग दुसऱ्या दोन बाजूंच्या वर्गांच्या बेरजेच्या बरोबर असतो. पण, तें गणितानें सिद्ध होईना. हें फार दिवस पुष्कळ विद्वानांस अडलें होतें. तें गूढ त्याला एके दिवशीं स्नान करितां करितां एकाएकीं सुटलें. तेव्हां त्याला जो हर्ष झाला, तो त्याच्या पोटांत मावेना. तो देहभान विसरला, आणि तसाच ओलेता, "झालें, झालें, झालें" असें ओरडत रस्त्यावर आला. केवढा चमत्कार आहे!

साधारण रस्त्यावरचा चिखल ह्मटला ह्मणजे तो माती, रेती, घेरोसा आणि पाणी मिळून झालेला असतो. त्यांतली माती वेगळी काढिली आणि शोधिली, तर तिचीं उत्तम पांढरीं स्वच्छ भांडीं होतात; रेती क्षार घालून शुद्ध केली, तर तिची उत्तम कांच होते; आणि घेरोसा शुद्ध केला, तर त्याचा उत्तम हिरा होतो. ह्या गोष्टी कल्पित नाहींत. खऱ्या आहेत. ह्या किती चमत्कारिक आहेत!

आणखी, सृष्टिग्रंथांमध्यें चूक अशी कदापि आढळावयाची नाहीं. जे नियम ठरले आहेत—जे गुणधर्म वस्तूंच्या ठायीं एकदा स्थापित केले आहेत—त्यांप्रमाणें सगळ्या गोष्टी बिंचूक घडावयाच्या. अफीम्यांची अशी एक गोष्ट सांगतात कीं, प्रसंगीं त्यांस फसवून, अफूच्या लोळीच्या ऐवजीं चिकणमातीची लोळी करून दिली, तर, तिच्या योगानें देखील त्यांस अंमल आल्याचा भास होतो. पण, आगकाडी चुकून उलटी ओढली तर ह्मणजे कधीं पेटली आहे, असें व्हावयाचें नाहीं. विस्तवावर पाय चुकून पडला, तरी तो भाजल्यावांचून राहावयाचा नाहीं. जगामध्यें कांहींही घडो, ज्योतिषशास्त्राच्या अनुरोधानें ताऱ्यांच्या गति ज्या समजल्या आहेत, त्या अगदीं तशा व्हावयाच्या—त्यांत तीळभरही अंतर पडावयाचें नाहीं. मग त्या गति आज व्हावयाच्या असोत, किंवा हजार वर्षांनीं व्हावयाच्या असोत; त्या पाहाण्यास पृथ्वीच्या पाठीवर कोणी माणूस असो कीं नसो, त्यांत चूक पडावयाची नाहीं. प्रूडहाम ह्या कवीनें एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, "ही ताऱ्यांची गति पाहाण्यास, कोणी माणूस असो कीं नसो, सत्य हें खचीत अढळ असावयाचें." ह्यांत काय संशय? सत्यास साक्ष सत्याची!

अथवा, सत्यच तें, त्याला साक्ष कशाला पाहिजे? ह्या तत्वावरून एका धर्मशास्त्रांत "देव सत्य आहे" असें ह्मटलें आहे. आपल्याही एका कवीनें ह्मटलें आहे:—

**सत्यापाशीं पुरुषोत्तम सर्वकाळ तिष्ठत.**

**मुक्तेश्वर.**

म्याके ह्या एका नामांकित ग्रंथकारानें ह्मटलें आहे कीं, "सृष्टिशास्त्र हें अगाध आहे. हे कधीं संपावयाचें नाहीं." खरें आहे. शंभर दीडशें वर्षांमागें, वाफेनें राक्षसी कामें होतील असें कोणास वाटलें होतें काय? विद्युल्लतेच्या योगानें बातम्या पोंचवितां येतील, असें कोणाच्या मनांत आलें होतें काय? सूर्यप्रकाशाच्या योगानें हुबेहूब चित्रें काढतां येतील, असें कोणाच्या स्वप्नांत तरी आलें होतें काय? अथवा, ध्वनि हा, एकाद्या जड पदार्थाप्रमाणें भांड्यांत कोंडून धरावा, आणि तो पाहिजे तेव्हां पाहिजे तेथें जशाचा तसा ऐकवावा, हें शक्य आहे, असें कोणीं कबूल केलें असतें काय? परंतु, ह्या सगळ्या गोष्टी खऱ्या झाल्या आहेत, आणि त्या बायकांमुलांसही ठाऊक झाल्या आहेत! तेव्हां ह्या सृष्टिग्रंथांत आणखी काय काय चमत्कार दृश्यमान होणार आहेत, ह्याचा अजमास कोणीं करावा?

प्रोफेसर हक्सले ह्यांनीं सृष्टिग्रंथाविषयीं अलंकारिक भाषेनें थोडेंसें लिहिलें आहे:—"सृष्टि हा बुद्धिबळांचा खेळ आहे. विश्व हा पट आहे. त्यांतले चमत्कार हीं मोहरीं आहेत. आणि सृष्ट पदार्थांच्या ठायीं स्थापित केलेले धर्म, हे त्या मोहऱ्यांच्या चालींचे नियम आहेत. एकीकडे खेळणारा मनुष्य आहे. दुसरीकडचा खेळणारा अदृश्य आहे. परंतु, तो मोठा न्यायी आणि सरळ आणि शांत आहे, ह्याविषयीं आपली खातरी

आहे. त्याप्रमाणेंच आपणांस असें ठाऊक आहे कीं, आमच्या हातून जर अल्पस्वल्प चुकी झाली,—मग ती अज्ञानानें होवो किंवा कशानें होवो—तिजबद्दल आह्मांस तीळभरही क्षमा व्हावयाची नाहीं; तर, तिजबद्दल शिक्षा खचीत व्हावयाची. जो कोणी उत्तम खेळतो, त्याला उत्तम बक्षीस तो देतो. असा तो मोठा उदार आहे. आणि जो कोणी चुकतो—बरोबर खेळत नाहीं—तो लागलींच त्याचीं फळें पावतो." खरें आहे. ह्या खेळ उत्तम प्रकारें खेळायास, मोहऱ्यांच्या गुणधर्मांचें आणि गतींचें ज्ञान उत्तम पाहिजे. मनुष्यास जें काय ऐहिक सुख झालें आहे, तें सगळें ह्याच ज्ञानाचें फल आहे.

मनुष्य हा एक फार विलक्षण पदार्थ आहे. ह्याच्या गुणधर्मांचें ज्ञान हेंही अत्यंत अमोलिक आहे. ज्योतिषांतल्या गणितानें जशा ग्रहांच्या गति आधीं सांगतां येतात, तशीं, मनुष्यकृतीचीं अनुमानें, आजपर्यंतच्या अनुभवांवरून सांगतां येत असतात. ह्या अनुभवांच्या शास्त्रासच इतिहास असें नांव आहे. मनुष्यांच्या कोणत्या कृतींनीं मागें काय झालें आहे, हें सांगतां येतें, त्याप्रमाणें, त्यांच्या सध्यांच्या कृतींवरून त्यांच्या पुढच्या स्थितीचें अनुमान सांगतां येतें. परंतु, सगळ्या सृष्ट वस्तूंत मनुष्य ही वस्तु अत्यंत विलक्षण आहे. त्याच्या कृतीविषयीं निर्विवाद असे सिद्धांत फारसे ठरवितां येत नाहींत. मनुष्यास सर्वांत द्रव्य अत्यंत प्रिय असतें ह्मणावें, तर, अब्रूकरितां जीव दिल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. अब्रू अत्यंत प्रिय ह्मणावी, तर द्रव्यसंपादनार्थ अब्रूची परवा न केल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. रावणविश्वामित्रादिकांच्या गोष्टींवरून वाटतें कीं मनुष्यास काम हा दुर्जय आहे. शुकाचा-

यांच्या कथेवरून वाटतें कीं कामजय हा मनुष्यास साध्य आहे. असे विरोध अनेक आढळतात. आणि ते सिद्धांतांच्या आड येतात. तरी, महानुभावांस मनुष्यांच्या कितीएक वृत्तींचें परिज्ञान इतकें झालेलें असतें कीं, त्यांवरून जीं अनुमानें ते करितात, तीं कधीं चुकत नाहींत; बरोबर मिळतात. फ्रान्स आणि जर्मनी ह्यांचें तुमुलयुद्ध झालें, त्या वेळीं जर्मन सैन्याचे मुख्य सेनापति काउन्ट मोल्टके हे होते. त्यांजविषयीं असें सांगितलें आहे कीं, ते स्वतः सैन्याबरोबर कधीं गेले नाहींत; तर ते आपल्या छावणींत तंबूमध्यें, समरांगणापासून पुष्कळ दूर बसलेले असत, तेथें त्यांस उभय पक्षांच्या सैन्यांची हालचाल कळे, आणि तेवढ्यावरून ते आपल्या सैन्यास चाल करण्याविषयीं तारायंत्रद्वारें हुकूम सोडीत असत. असें करून त्यांनीं जय मिळविला. ह्याविषयीं आह्मी असें ह्मणतों कीं, त्यांस युद्धशास्त्र चांगलें अवगत होतें. ह्मणजे, त्यांस सैन्याचे गुणधर्म चांगले कळले होते, ह्मणूनच त्यांस असें करितां आलें. ह्मणजे, आपलें अमुक सैन्य अमक्या स्थितींत शत्रूंनीं अमक्या ठिकाणीं पाहिलें कीं, ते अमक्या मार्गानें अमक्या ठिकाणीं जाऊन अमकें करावयाचेच, असें त्यांस सिद्धांतवत् समजलें होतें. असें मनुष्यांच्या स्वभावाच्या गुणधर्माचें ज्ञान जर मनुष्यास चांगलें होईल—ह्मणजे जर त्याला मानवस्वभावशास्त्र उत्तम प्रकारें येईल—तर दुसऱ्या माणसास वश करून घेणें, आपली हानि करण्याविषयीं कोणास बुद्धि न होऊं देणें, आपलें हित करण्याविषयीं दुसऱ्यांस स्फूर्ति होणें, इत्यादि अत्यंत इष्ट कार्यें त्याला सहज सहज करितां येतील. आणि ज्याला हीं कार्यें करतां येतील, तो पूर्ण मनुष्यत्वास चढला

आहे, असें ह्मटलें पाहिजे. आणि हें पूर्णत्वास चढणें शास्त्रज्ञानावांचून व्हावयाचें नाहीं.

सृष्टिशास्त्राच्या अध्ययनानें नुसता चमत्कारच जर वाटता, तर त्याचा इतका गौरव करायास नको होता. कां कीं, चमत्कार वाटणें ही एक करमणूक आहे खरी, परंतु, ती अल्पकालिक असते; तिचा उपयोग व्यवहारांत होत नाहीं. पण सृष्टिज्ञानाची जी एवढी महति वर्णीत आहेत, तीस मुख्य कारण त्याचा उपयोग आहे. दुसरीं लांबचीं उदाहरणें नकोत. इंग्लंद देशांतल्या लोकांस जर सृष्टिज्ञान नसतें, त्यांस कोळसा, लोखंड आणि दुसरे सृष्ट पदार्थ ह्यांचा उपयोग जर न कळता, तर ते एवढ्या उन्नतावस्थेस चढले नसते. ते सध्या, ह्या सृष्टिशास्त्रज्ञानाच्या साह्यानें उन्नतीच्या शिखरावर जाऊन बसले आहेत! आणि ते कितीएक राष्ट्रांचे राजे झालेआहेत, ह्यासही मुख्य कारण त्यांचें सृष्टिशास्त्रज्ञान होय. इ०स० १८६१ ह्या वर्षीं विलायतेस सृष्टपदार्थविज्ञानाच्या विचाराकरितां एक मोठी विद्वत्सभा भरली होती. तिनें आपल्या निबंधांत ह्मटलें आहेः—"सृष्टिशास्त्राभ्यासानें माणसांची बुद्धि तीव्र होते; त्यांस अवलोकन करितां येऊं लागतें; त्यांस गुणांचें आणि वस्तूंचें वर्गीकरण येऊं लागतें; कारण कोणतें आणि कार्य कोणतें तें शोधून काढितां येतें; त्यांना विचार करतां येऊं लागतो, आणि त्यापासून त्यांस आनंद होतो. आणि आळस ह्या रोगास ह्या औषधासारखें दुसरें औषध नाहीं!" खरें आहे. अशा प्रकारें ज्यांचें अंतःकरण सृष्टिग्रंथ वाचण्यांत गुंततें, त्यांस उद्योगाचा समुद्र दिसूं लागतो. हें करूं का तें करूं, हें पाहूं का तें पाहूं,

असें होतें. वेळ पुरत नाहीं. ह्याहून अधिक चांगला हव्यास प्रपंचांत कोणता व्हावा!

हा हव्यास जर मनास लागला, तर, प्रपंचांत केवढा तरी विरंगुळा होईल! दुःखांचा विसर किती तरी पडेल! अश्लाघ्य आणि नीच विषयांतून मन किती तरी निघेल! परमेश्वरभक्ति आणि सज्जनता ह्यांची वृद्धि किती तरी होईल! कांहीं सांगतां येत नाहीं. आणखी हा हव्यास, पाहिजे त्या स्थितींत, पाहिजे त्या माणसाला, पाहिजे तेव्हां करतां येण्यासारखा आहे. सर जान लबाक ह्या विद्वान गृहस्थानें, मुंग्या आणि माशा ह्यांच्या वृत्तींचा शोध लावण्याकरितां शेंकडों वारुळें घराजवळ ठेविलीं आहेत, आणि त्यांत लक्षावधि माशामुंग्या त्यांनीं ठेविल्या आहेत. त्यांच्या संवयींच्या अवलोकनार्थ, नानाप्रकारचे प्रयोग करून, ते त्यांत प्रहरांचे प्रहर दररोज घालवितात. त्याविषयीं त्यांनीं ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत त्यांस जो आनंद होतो, तो दुसऱ्या कशापासूनही होत नाहीं. असे शोध कावळे, चिमण्या, कुतरीं, मांजरें, उंदीर, पोपट, वाघूळ, गाय, बैल, घोडे, बकरे, इत्यादि अनेक प्राण्यांविषयीं करण्यास पाहिजे तितकी जागा आहे. तसाच प्रकार वनस्पतींचा आहे; तसाच खनिजांचा आहे. वैद्यशास्त्रावर भारतप्राय शेंकडों ग्रंथ आहेत. आणि त्यांत वस्तूंच्या गुणधर्मांचें वर्णन करण्यास मोठमोठ्या ज्ञात्यांनीं आपली पराकाष्ठा केली आहे. तरी, आह्मी असें ह्मणतों कीं, साधारण सुंठीचे देखील सगळे गुणधर्म अद्याप माणसांस समजले नाहींत. गोस्तन देवींची गोष्ट तर एका धनगराच्या लहानशा मुलीकडून डाक्टर जेन्नर ह्यांस नुकती परवां कळली! अशा गोष्टी कोणाकोणास किती

किती माहीत आहेत, ह्याचा अंत लागत नाहीं. जखमा बऱ्या करण्याचीं झाडपाल्याचीं औषधें रानटी लंगोट्या धनगरांस ठाऊक आहेत, तीं आमच्या मोठमोठ्या नामांकित इंग्लिश धन्वंतऱ्यांस ठाऊक नाहींत. हिमालयासारख्या पर्वतांवर कोट्यवधि वनस्पति आणि खनिजें आहेत, त्यांची नुसती ओळख देखील माणसांस अद्याप झाली नाहीं. मग त्यांच्या गुणधर्मांची गोष्ट कशास पाहिजे ! मनुष्याच्या सुखाची वृद्धि करण्यास समर्थ आणि दुःखाचा नाश करण्यास समर्थ असे गुण त्यांचे ठायीं किती तरी असतील ! केवढा ज्ञानसागर हा ! ह्या सागरांतला एक बिंदु देखील अद्याप माणसांच्या हातीं लागला नाहीं ! लक्ष योजनें लांब आणि लक्ष योजनें रुंद अशा वाळवंटांतला वाळूचा एक कण देखील प्राप्त झाला नाहीं ! हेंच सर ऐझाक न्यूटनाच्या मनांत उभें राहून त्याच्या मुखांतून ते प्रसिद्ध उद्‌गार निघाले ! ! काय नवल आहे !

आणखी हें सृष्टचवलोकन धर्मश्रद्धावृद्धि करण्यास उत्तम साधन होतें. सृष्टींतले चमत्कार सर्वव्यापक पाहून परमेश्वराच्या सर्वव्यापकत्वाविषयीं माणसांची खातरी होते. परमेश्वर सर्वत्र आहे, तो नाहीं असें स्थान सृष्टींत नाहीं, अशी त्यांची खातरी होते; तेणेंकरून, ते कोठें एकटे दुकटे असले तरी पापकर्माविषयीं त्यांची पराङ्मुखता असते, आणि सत्कर्मांविषयीं उत्सुकता जागृत असते. त्यांचे अंतःकरणांत **"विश्वात्मा"** हें देवाचें नांव चांगलें ठसतें. पळून जाण्याची उत्तम संधि मित्रमंडळीनें आणून दिली असून देखील, प्राणरक्षणाकरितांसुद्धां, साक्रेटीस पळाला नाहीं. तें कां, तर आपण हें पाप गुप्तपणें

केलें तरी देवास कळल्यावांचून राहावयाचें नाहीं, अशी त्याची निष्ठा होती. ह्मणजे सांगायाचें तात्पर्य एवढेंच कीं, सृष्टचवलोकन हें, मनुष्याच्या आचरणशुद्धीस—आणि तद्द्वारा मोक्षप्राप्तीस—उत्तम प्रकारचें साधन होतें. ह्मणून, प्रपंचामध्यें, वेळांत वेळ करून, करवेल तितकें सृष्टचवलोकन करावें, हें सर्वोपरी कल्याणप्रद आहे.



# १२.

## शरीरसंपदा.



प्रपंचांत सुख होण्यास शरीरसंपदा चांगली असली पाहिजे; ह्मणजे आरोग्य पाहिजे. द्रव्यादि इतर सगळ्या सुखदायक वस्तु अनुकूल आहेत, आणि जर आरोग्य नाहीं, तर त्या वस्तूंचा कांहीं उपयोग नाहीं. त्या वस्तु असून नसून सारख्या होतात. कितीएक लक्षाधीश सावकारांस मधुमेहाच्या व्यथा झालेल्या आहेत; आणि त्यामुळें त्यांस नुसत्या गव्हांच्या कोंड्याच्या भाकरीवर राहावें लागत आहे. त्यांचे चाकर जें सुग्रास अन्न खात असतात, तें त्यांस खातां येत नाहीं. अशा माणसांस, खाण्याच्या संबंधानें, ती संपत्ति निरुपयोगी होते. आणि खाणें आटलें ह्मणजे त्याबरोबर सगळें आटतें. ज्यास अन्नच चांगलें जात नाहीं, त्यास शक्ति कोठून येणार, त्याच्या हातून काम काय होणार, आणि त्यास दुसरे कसले उपभोग घेतां येणार! अशी स्थिति असणें हें अत्यंत क्लेशप्रद आहे.

तर मग आरोग्य हें सर्व उपभोग्य वस्तूंमध्यें श्रेष्ठ आहे. ह्यास्तव तें संपादण्यास आणि तें संभाळण्यास फार जपायास पाहिजे. ह्यांत सगळेंच माणसाच्या हातचें नाहीं. आईबापांचा रोग मुलांस जडतो, तेथें त्यांचा उपाय चालत नाहीं. लहानपणीं, चुकून कांहीं अव्यवस्था होऊन रोग जडतात, तेथेंही माणसाचा निरुपाय आहे. लहानपणीं मुलांचें आरोग्य चांगलें राखणें हें आईबापांच्या किंवा पालनकर्त्यांच्या हातीं असतें.

आणि प्रौढपणा आल्यावर आणि आरोग्य ह्मणजे काय तें कळल्यावर त्याचें रक्षण करणें किंवा तें वाढविणें हें स्वतः माणसाकडे असतें. पण हें संभाळतां येण्यास किंवा वाढवितां येण्यास आरोग्यरक्षणाविषयीं कांहीं ठोकळ ठोकळ तरी गोष्टी कळल्या पाहिजेत.

सर जान लबाक ह्यांनीं सांगितलें आहे कीं "खाण्यापिण्यादिकाविषयीं नेमस्तपणा, प्रत्यहीं व्यायाम, आणि नियमित संवयी, हींच आरोग्याचीं मुख्य साधनें आहेत. हीं चांगलीं पाळिलीं ह्मणजे मनुष्याची प्रकृति चांगली राहील." होय. हें खरें आहे. आणि हें थोडक्यांत सांगितलें आहे; पण ह्याची व्यापकता फार मोठी आहे. त्यांत नेमस्तपणा आणि नियमितपणा हीं मुख्य तत्वें आहेत. त्यांत नेमस्तपणाचें माहात्म्य अधिक आहे.

आणखी आरोग्य ह्याचें मुख्य लक्षण हें आहे कीं, आपल्या शरीरव्यापाराचीं इंद्रियें आपल्या स्वाधीन असावीं. लघ्वी किंवा परसाकडे ह्यांचा तगादा झाल्याबरोबर जावें लागावें, न गेल्यास विधि जागचेजागीं व्हावे, हें दुखणें आहे. त्याप्रमाणेंच दाहा वाजतां जेवायाचें, त्याला अकरा वाजले कीं झालें पित्त, असें होणें हें दुखणें आहे. ह्या गोष्टी, फार नाहीं पण बराच वेळ आपले स्वाधीन ठेवितां येण्याचें जें सामर्थ्य असतें, त्यासच आरोग्य ह्मणतात. आणखी, जपून किंवा औषधें घेऊन जें काय संपादावयाचें आहे तें हेंच आहे.

इराणच्या बादशाहानें एक उत्तम वैद्य एका गांवीं लोकांस साह्य करण्यास पाठविला. तो तेथल्या लोकांस, तुह्मी कसे काय राहातां ह्मणून विचारूं लागला. तेव्हां त्यांनीं उत्तर

दिलें कीं, "आह्मी भूक लागल्यावांचून कांहीं खात नाहीं, आणि भूक लागल्यावरही जें खातों, तें, थोडीशी भूक शिलक राही असें खातों." तें ऐकून वैद्य ह्मणाला कीं, "तर मग मला येथें कांहीं एक उद्योग मिळायाचा नाहीं. मी दुसऱ्या गांवीं जातों." ह्या गोष्टीचें तात्पर्य उघड आहे.

नेमस्तपणा आंगीं येण्यास विचार जागृत पाहिजे. कोणी एक कवि ह्मणतो कीं, "इच्छा आपले स्वाधीन ठेवणें हाच नेमस्तपणा आहे." पदार्थ फार चांगला लागला ह्मणजे तो पुष्कळ—बेताबाहेर—खाण्याची इच्छा होते, ती दाबिली पाहिजे. नाटक चांगलें होत असलें ह्मणजे, रात्रीचें भान राहात नाहीं, तेथें सावध राहून बेताबाहेर जागरण न होईल असें जपलें पाहिजे. हा प्रकार इतर सगळ्या उद्योगांस आणि उपभोगांस एकसारखा लागू आहे.

मोठ्या रोगांची गोष्ट क्षणभर एकीकडे असो. पण, आपणां सर्वांस असा अनुभव येतो कीं, कांहीं तरी अतिक्रम झाल्यावांचून प्रकृति सहसा बिघडत नाहीं, आणि तो अतिक्रम समंजस माणसांच्या लक्षांत येण्यास उशीर लागत नाहीं. तो अतिक्रम टाळिला पाहिजे. तो अतिक्रम तरी दोन प्रकारचा आहे. एक आधिक्याचा आणि एक न्यूनत्वाचा. अन्न भुकेपेक्षां अधिक खाणें हा अतिक्रम आधिक्याचा होय, आणि भुकेपेक्षां फार कमी खाणें हा न्यूनत्वाचा होय. ह्यांपैकीं, आधिक्याचा अतिक्रम फार बाधतो, तितका न्यूनत्वाचा बाधत नाहीं. फार खाणें खाल्यानें प्रकृति पुष्कळांच्या बिघडतात, तितक्या कमी खाल्यामुळें बिघडत नाहींत. एकवत करणाऱ्या माणसांस दुखणें फार कमी येतें.

लार्ड बेकन ह्यानें एका ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, "परक्या स्थलीं गेल्यावर प्रथम वैद्य आणि धर्मोपदेशक ह्यांचा स्नेह संपादावा." त्याचें तात्पर्य असें कीं, वैद्य हा शरीराच्या आरोग्यास आवश्यक आहे, आणि धर्मोपदेशक हा आत्म्याच्या आरोग्यास आवश्यक आहे. त्यांत वैद्याची आवश्यकता विशेष असते. खरोखर, सगळ्या विद्यांमध्यें वैद्यविद्या अत्यंत उपयोगी, आणि ह्मणून अत्युत्तम आहे. ही विद्या नाहीं असा देश नाहीं. ही विद्या उपयोगीं पडत नाहीं, असें माणूस नाहीं; आणि ही विद्या थोडी तरी कळत नाहीं, असेंही समंजस माणूस नाहीं. कां कीं, ह्या विद्येचा मुख्य विषय शरीर, तें प्रत्येकास आहे.

रानटी अज्ञान लोकांत असा समज असतो कीं, दुखणीं हीं भूतचेष्टांनीं येतात. आणि ह्मणून त्यांच्यांतले भट तेच वैद्य असतात. मंत्र कागदावर ल्याहावा, आणि तो कागद कुवळून प्यावा, असा एक उपाय रानटी लोकांत करितात. कांहीं देशांत, औषध रोग्यास प्यावयाचें नसे, तर वैद्यास प्यावयाचें असे. हें अज्ञान कमी होत जाऊन, ज्ञान वाढत जातें, तसतसा हा समज नाहींसा होतो, आणि रोग निवारणाचे उपाय वाढूं लागतात. तरी, रोगनिवारण पुरतें हातीं न आल्यामुळें निरुपाय झाल्यावर आतुर माणसें बाह्योपचार करूं लागतात. पण तो भ्रम आहे.

वैद्यांवर विश्वास पाहिजे. आपलें बरेंपण हें त्यांच्या लाभास कारण होतें, ह्मणून त्यांच्या हातून प्रतारणा व्हावयाची नाहीं, हें लक्षांत ठेवावें. आपल्या फायद्याकरितां रोग्याचें दुखणें लांबणीवर घालतील, असे अधम वैद्य जगांत फार थोडे असतील.

अनेक देशांत अनेक रीतींनीं आरोग्याचें रक्षण करितात.

चिनामध्यें अशी चाल आहे कीं, प्रकृति चांगली असते तोंपर्यंत वैद्याची संभावना करावयाची, आणि प्रकृति बिघडली कीं ती बंद करावयाची. प्राचीन इजिप्शियन लोकांत अशी चाल असे कीं, प्रथम कांहीं दिवस रोग्यानें वैद्यास पैसे देत असावें, आणि पुढें वैद्यानें रोग्यास पैसे देत असावें. कोणीकडून तरी, रोग नाहींसा करण्याविषयीं वैद्यानें त्वरा करावी, एवढीच तजवीज त्यामध्यें दिसते.

लहानपणापासून प्रकृतीस जपण्याची आवश्यकता आणि प्रकृतीस जपण्याचीं साधनें हीं तरुणांच्या मनांत ठसलेलीं नसतात, ह्यामुळें दुखणीं फार येतात. आह्मांला असें वाटतें कीं, इतर शास्त्रांतले नियम मनांत ठसण्यापेक्षां आरोग्याचे नियम मनांत ठसावे, आणि त्याप्रमाणें वागण्याची वृत्ति व्हावी, हें फार आवश्यक आहे. कांकीं, आरोग्य असेल तर बाकीच्या शास्त्रांचा उपयोग होईल; पण जर आरोग्यच नाहीं, तर बाकीच्या शास्त्रांच्या ज्ञानाचा उपयोग कांहींएक व्हावयाचा नाहीं.

मनुष्यास काय आणि राष्ट्रास काय, इतर संपदेपेक्षां शरीरसंपदा फार उपयोगीं पडते. शरीरसंपदेच्या जीवावर इतर संपदांचें रक्षण होतें. इतिहास पाहिले तर असें दिसून येतें कीं, राष्ट्रांस परदेश जिंकण्यासारखीं जीं मोठमोठीं कामें करतां येतात, त्यांस मुख्य साधन शरीरसंपदा असते. ह्मणून शरीरसंपदेस जपवेल तितकें जपावें.

आरोग्यरक्षणाचीं जीं साधारण साधनें वर सांगितलीं आहेत, त्यांमध्यें आणखी एक साधें साधन मिळवावें. तें हें कीं, अन्न जें आहे तें चांगलें चावूनचावून खावें. नामदार ग्ल्याडस्टन साहेबांनीं आपल्या दीर्घायुष्याचीं कारणें सांगतांना एकदां असें

ह्मटलें कीं, मी प्रत्येक घांस निदान पंचवीस वेळ तरी चावतों, तेणेंकरून माझें अन्न चांगलें जिरतें. ह्मणजे, अन्नांत आपली थुंकी जितकी जितकी अधिक मिसळते, तितकें तितकें तें अधिक चांगलें पचतें, असें प्रत्ययास आलें आहें. दूध हें ज्यांस कधीं पचत नसतें, त्यांनीं तें जर चघळूनचघळून थोडें थोडें घेतलें, तर तें पचतें, बाधत नाहीं, असा प्रत्यय आला आहे. ह्मणजे ह्यांतही वर सांगितलेलेंच तत्व सिद्ध होतें. ह्मणून, लहानपणीं मुलें आधीबिदी करण्याकरितां भराभराभरा जेवतात, तसें त्यांस करूं देऊं नये. त्यांस चाऊन चाऊन अन्न खाण्याची सवय लावावी.

अशा प्रकारें कितीही जपलें, तरी दुखणें येतेंच. तें कांहीं अगदीं चुकवितां येत नाहीं. पण, अशा रीतीनें वागल्यावर कमी येतें. त्यांत औषधपाणी यथास्थितपणें घ्यावें. त्यांत कमी पडूं देऊं नये. आणखी चित्त स्थिर ठेवावें हें विशेष आहे. घाबरेपणानें त्रास मात्र होतो; लाभ कांहींएक होत नाहीं. दुखण्याचा संबंध मुख्यत्वेंकरून शरीराशीं असतो; तरी, मनाची स्वस्थता हें प्रकृति चांगली नीट होण्यास—किंवा अधिक न बिघडण्यास आवश्यक साधन आहे. जर्मनीचा बादशाहा विलियम आणि त्याचा पराक्रमी मुलगा फ्रेडरिक हे दोघेही एके वेळीं फार आजारी होते. दोघे ही अत्यावस्थ होते, तरी त्यांचे समाचार परस्परांस कळवीत नसत. त्याप्रमाणेंच, आजारी माणसास चांगल्या चांगल्या गोड गोष्टी सांगून त्याचें मन रंजवावें आणि तें त्याच्या दुखण्याकडून काढवेल तितकें काढावें, असें आधुनिक वैद्य सांगत असतात. ह्यांतलें बीज हेंच

आहे. तात्पर्य एवढेंच आहे कीं, दुखणें शांतपणें सोसावें, हें चांगलें आहे. कदाचित् लवकर बरें होण्यास तें फार उपयोगी पडतें. शिवाय, आरोग्याकरितां परमेश्वराची प्रार्थना करावी, हें एक सर्वांत उत्तम साधन आहे. सर्व उपायांपेक्षां त्याची कृपा अधिक गुणकारी होते. हा अनुभव भाविकांस आला आहे. म्हणून ते ह्याची फार प्रशंसा करितात. आणखी आम्हांला असें वाटतें कीं हें साधन सर्वांच्या उपयोगीं पडेल.



## १३.

# प्रपंचांत सुखसमाधान.



परमेश्वरानें ह्या लोकीं आपणांस जन्मास घातलें आहे, ही एक त्याची मोठी देणगी आहे. हिजबद्दल आपण त्याचे उपकार मानिले पाहिजेत. आणखी, त्याची कोणतीच कृति अहेतुक नसते, प्रत्येक कृतींत कांहीं तरी चांगला हेतु असतो, असा जो सगळया शास्त्रांचा सिद्धांत आहे, त्यावरून आपण खचीत असें समजावें कीं, आपला जीव जरी एवढासा आहे, आणि आपली शक्ति जरी एवढीशी आहे, तरी, तींत कांहीं-तरी हेतु आहे. तो हेतु काय असावा, हा एक मोठा प्रश्न आहे, असें प्रथम मनांत येतें. पण तसें कांहीं नाहीं. सर्व प्रकारचीं माणसें—मग तीं अक्षरशत्रु असोत कीं मोठीं पंडित असोत, अत्यंत दुराचारी असोत कीं अत्यंत पवित्र असोत—असें समजतात कीं, दुसऱ्याचें बरें करणें हें फार चांगलें कृत्य आहे, मोठें पुण्य आहे. ह्याविषयीं कोठेंही मतभेद नाहीं. बरें तर, एवढ्यावरून जर विचार करून पाहिला, तर, दुसऱ्याचें चांगलें करावें, हाच आपल्या जन्माचा मुख्य हेतु आहे. तो फार चांगला आहे. आणि

**तुका ह्मणे मायबापें, अवघीं देवाचीं स्वरूपें.**

हें जर अगदीं खरें आहे, आणि भावंडांनीं एकमेकांस साह्य केल्यानें जर आईबापांस अत्यंत संतोष वाटत आहे, तर, आपण सर्व माणसें एकमेकांचें बरें करण्यास झटत आहों, असें

आपल्या सर्वांच्या पित्यानें—परमेश्वरानें—पाहिलें असतां त्यास संतोष होईल, आणि तो आपणांस आशीर्वाद देईल, हें अगदीं निर्विवाद आहे.

आणखी दुसरें असें आहे कीं, परोपकार करण्याच्या कामीं जर आह्मीं आपली पराकाष्ठा केली, दुःखें प्राप्त होतात त्यांचा मुंगीचा हत्ती केला नाहीं, दृढ निश्चयानें सत्कार्यें करीत चाललों, आपणांस प्राप्त झालीं आहेत त्या सुखांचा उपभोग घेतला, आणि आपणांस सुखी करून घेण्याचीं जीं साधनें आपल्याभोंवतीं आहेत त्यांचा उपयोग यथायोग्य केला, तर, आपलें जीवित हें अत्यंत सुखावह आहे, असें आपणांस खचीत वाटेल.

आपणां स्वतःस सुखी करण्याचा प्रयत्न आपण करावा कीं नाहीं, हा संशय कितीएकांस येतो. त्यांत कांहीं विशेष अर्थ नाहीं. परोपकार केल्यानें जर आपणास समाधान वाटत आहे, आणि समाधान हेंच जर सुखाचें बीज आहे, तर परोपकार करणें हें परंपरया आपणास स्वतःस सुखी करणें आहे. एब्राहाम लिंकन ह्मणून कोणी एक थोर पुरुष, एका प्राण्याला चिखलांतून बाहेर काढण्याकरितां एके वेळीं दोन तीन कोश पळत गेला. त्यावरून त्याच्या मित्रांनीं त्याला मोठा परोपकारी आणि साधु ह्मटलें. त्यांस त्यानें असें उत्तर दिलें कीं, "ह्यांत मीं परोपकार तो काय केला? मी जो इतका पळत पळत गेलों, तो त्या प्राण्यास चिखलांतून काढण्याकरितां गेलों नाहीं; तर, त्याला दुःखमुक्त केल्यानें माझ्या अंतःकरणास जें काय सुख वाटलें, त्या सुखाच्या आशेनें मी इतका पळत पळत गेलों." परोपकाराची मौज हीच आहे; त्यानें उभयपक्षांचें बरें होतें; वाईट कोणाचेंच होत नाहीं.

पण, परोपकाराचा किंवा सत्कृत्यांचा विचार करण्यास अवकाश कोठें आहे? आयुष्य क्षणभंगुर आहे; आतां आहे, आणि क्षणभऱ्यानें नाहीं. अशी स्थिति आहे. एक कवि ह्मणतो, "जीव हा वारा आहे. अतिशयित चंचल आहे. आतां येथें आहे, पण क्षणभऱ्यानें कोठें जाईल ह्याचा नेम नाहीं." खरें आहे. ह्मणून, एकादी चांगली गोष्ट करावयाची मनांत आली, तर ती लागलीच करावी; मागें टाकूं नये. कां कीं, पुढचा कांहींएक नेम सांगवत नाहीं.

घराबाहेर पडायाचें, आणि कोणीकडे तरी जावयाचें, असें नसावें; अमकीकडे जावयाचें, आणि अमुक करावयाचें, असें कांहींतरी असावें. तसें, उगाच आपलें जगायाचें ह्मणून जगायाचें, असें नसावें. तर, जन्मांत आपल्याला अमुक एक करावयाचें आहे, असें कांहींतरी ठरलेलें असावें, आणि तें करण्याचा प्रयत्न नेहमीं चालू असावा. मग तें सगळें होवो कीं न होवो. तें अर्धेमुर्धें राहिल्याचा दोष आपणांकडे नाहीं. सगळ्या जगाचें कल्याण हें एक महत्कृत्य सगळ्या माणसांस करावयाचें आहे. त्यास अमुक माणसें पुरतील किंवा अमुक काल पुरेल, ह्याचा कांहीं निश्चय करितां यावयाचा नाहीं; कां कीं, तें कल्याण अपरंपार आहे. ह्मणून ज्याला जितकें त्यांतलें करतां येईल, त्यानें तितकें करावें, एवढेंच कायतें त्याचें कर्तव्य आहे. वाफेच्या ज्या यंत्रानें लक्षावधि कारखाने चालत आहेत, त्या यंत्राची थोडी थोडी अशी रचना पुष्कळांचे हातून झालेली आहे.

आपलें आयुष्य आपण वर्षांनीं मोजूं नये; तर सत्कृत्यांनीं मोजावें. एकादा दुष्ट रामोशी साठ वर्षें जगला, तर त्याचा काय उपयोग? त्यापासून वाइटाच्या राशी पडावयाच्या, चांगलें कांहीं

व्हावयाचें नाहीं. काशिनाथ त्रिंबक तेलंग ह्यांचें स्मारक करण्याकरितां मुंबईस मोठी सभा भरली होती. तेव्हां अनेक मोठ्या माणसांचीं भाषणें झालीं. त्यांत रेव्हरेंड डाक्टर म्याकिकन, त्यांचें स्तुतिस्तोत्र करून ह्मणाले कीं, "तेलंग हे फार दिवस जगले नाहींत हें खरें आहे; पण ते पुष्कळ जगले, ह्यांत कांहीं संशय नाहीं." ह्याचा अर्थ असा कीं, पुष्कळ वर्षें जगून जें करावयाचें, तें थोडा वेळ जगून त्यांनीं केलें. आपण सर्वांनीं जितकें पुष्कळ जगवेल तितकें पुष्कळ जगण्याचा प्रयत्न करावा; पुष्कळ वर्षें जगण्याच्या प्रयत्नाच्या भरीस पडूं नये. कां कीं तें परमेश्वराधीन आहे, आपल्या स्वाधीन नाहीं.

पण, माणसें सत्कृत्यें करण्याची संधि भुलतात, आणि मग पस्तावतात. तारुण्य ही ज्ञानसंपादनाची मोठी संधि आहे. ती कितीएक माणसें अविचारानें गमवितात—फुकट घालवितात, आणि मग ह्मातारपणीं दुःख पावून रडत बसतात. आयुष्य हा एक मार्ग आहे, तो फार चमत्कारिक आहे. त्यानें आपणांस एकदा जावयाचें आहे, पुनः जातां यावयाचें नाहीं. तरी, पुढें गेल्यावर आपणांस मागें पाहतां येतें, मागें परततां मात्र येत नाहीं. आणखी, मागें पाहिल्यावर, आपण कोणकोणत्या चांगल्या वस्तु उचलावयास चुकलों हें कळतें, आणि त्यांजकडे पाहून वाईट वाटतें. वृद्धापकाळीं बाळपणाविषयीं विचार करितां येतो, आणि बाळपणांत झालेल्या चुक्या स्पष्ट दिसूं लागतात; परंतु, त्या चुक्या काढून टाकण्याचें सामर्थ्य अंगीं नसतें, रिकामा पश्चात्ताप मात्र होतो. हा पश्चात्ताप फार खेदप्रद असतो. तो आपणांस भोगावा लागत आहे, तसा आपल्या प्रिय मुलांबाळांस भोगावयाची पाळी येऊं नये, अशी तजवीज ठेवणें

हें प्रौढ माणसांचें अत्यंत आवश्यक आणि अत्यंत पवित्र कर्तव्य आहे.

सेंट बर्नार्ड ह्यानें असें लिहिलें आहे कीं, "माझा नाश मजशिवाय दुसऱ्या कोणासही करितां यावयाचा नाहीं. मी जीं दुःखें भोगितों, तीं सगळीं माझ्या कृतीचीं फळें आहेत." असें मानण्यांत फार मौज आहे. आपल्या हातून आपली हानि झाली, तर तिजविषयीं खेद मात्र होतो; पण ती हानि दुसऱ्यानें केली असें कळलें, ह्मणजे खेद होऊन आणखी संताप होतो. आणि त्या संतापापासून कांहीं उपयोग होत नाहीं.

दुसऱ्यांस सुखी पाहून हर्षित व्हावें, ह्यांत मोठी मौज आहे, मोठा लाभ आहे. प्रत्येक प्राणी सुखी होण्याचा प्रयत्न करीत असतो, त्यांत त्याला जें यश येतें तें त्याचें सुख, त्यांत आपण वांटेकरी होतों. असे लहान लहान वांटे एकत्र केले, तर केवढी तरी रास होते. आपण एकाद्यास दुःखमुक्त केलें, ह्मणजे त्यापासून त्याला जो आनंद होतो, त्याचा वांटा आपणांस मिळतो. हा परोपकाराचा तात्कालिक लाभ आहे.

स्वतःच्या सुखदुःखाचा कर्ता मनुष्य असतो, असें सत्पुरुष ह्मणतात.

इपिक्टिटस ह्मणतो कीं, "जर मनुष्य सुखी नाहीं, तर तो त्याचा स्वतःचा दोष असला पाहिजे. कां कीं, सर्व माणसांनीं सुखी असावें, ह्मणून त्यांना देवानें उत्पन्न केलें आहे."

सर जॉन लबाक ह्मणतातः—"आह्मी सुखी नाहीं, हा आमचा दोष आहे. साक्रेटिस हा तीस जुलमी अमलदारांच्या ताब्यांत होता, तरी तो सुखी होता. इपिक्टिटस हा एक गरीब गुलाम होता, तरी तो नेहमीं आनंदांत असे."

एकादी वस्तु आपणांस त्रासदायक वाटते, तीवरून आपणांस राग येतो. पण, त्यांत चमत्कार असा असतो कीं, त्या वस्तूपासून आपणांस जितका त्रास होत असतो, त्यापेक्षां त्या रागापासून अधिक त्रास होत असतो. संताप करूं नये.

वास्तविक ह्मटलें तर, प्रपंचामध्यें आपणांस नित्य पुष्कळ चांगल्या गोष्टी प्राप्त होत असतात, त्यांबद्दल आपण परमेश्वराचे आभार मानिले पाहिजेत, आणि संतुष्ट राहिलें पाहिजे. प्रातः-काळीं सूर्य उगवतो, तो आपणांस प्रकाश देतो. तृणवृक्ष वाढतात, त्यांस फुलें फळें येतात, तीं नेत्रांस आनंद देतात, त्यांच्या सुवासानें घ्राणास संतोष वाटतो, खायास अन्न मिळतें, प्यायास पाणी मिळतें, पांघरायास वस्त्र मिळतें, प्रेम करायास सोयरींधायरीं मिळतात, बोलाचालायास सज्जन मिळतात, वाचायास ग्रंथ मिळतात, विचार करायास नानाप्रकारचे विषय पुढें येतात, परोपकार करायास पात्र अशीं स्थळें दृष्टीस पडतात, परमेश्वरभक्ति करण्याचे मार्ग साधुजन दाखवितात, आणि विश्वाची राहाटी पाहून मनाला आनंद आणि चमत्कार वाटतो. आणखी, मरणोत्तर आपणांस आपणां सर्वांचा पिता आपलेजवळ निरंतर सुखांत ठेवील, अशी खातरी पटण्यासारखे विचार मिळतात. ह्या गोष्टी थोड्या आहेत काय? ह्यांबद्दल देवाचे आभार मानणें आणि त्याला शरण जाणें ह्यांत खरोखर मोठी मौज आहे. अनुभव घेऊन पहा.

परमेश्वरानें दिलें आहे, त्यांत तृप्त असणें हा एक मोठा संतोष आहे खरा. परंतु, विचारी पुरुष जे आहेत, ते, त्या स्थितीबद्दल त्याचे आभार मानून, तिची पूर्णता होण्याकरितां, त्यापाशीं आणखी आणखी मागत असतात. तो कांहीं हांवरेपणा नव्हे;

तर, सद्‌गुरूपाशीं सच्छिष्यानें ज्ञानदानार्थ वारंवार प्रार्थना करावी—आळ घ्यावी—तसें तें आहे. पंतांनीं देवाला ह्मटलें आहे:—

श्लोक.

**पटुत्व सकलेंद्रियीं मनुजता सुवंशीं जनी**
**द्विजत्वहि दिलें भलें बहु अलभ्य जें कीं जनीं**
**यशश्रवणकीर्तनीं रुचि दिली तरी हांवरा**
**ह्मणे अधिक द्याच कीं अखिल याचकीं हावरा.**

इपिक्टिटस ह्यानें असें ह्मटलें आहे कीं, "विचार करायास अनेक विषय आहेत, सूर्य दिसत आहे, चंद्र दिसत आहे, तारे दिसत आहेत, आणि पृथ्वी व आकाश ह्यांचा उपभोग घेत आहे, अशा माणसास गरीब बिचारा एकटा, त्याला कोणी नाहीं, असें कां ह्मणावें?"

ह्मणजे, सगळ्या सुखांचें बीज संतोषांत आहे. आणखी तो संतोष, प्राप्तावस्थेंत ठेविला ह्मणजे जन्म सुखाचा होतो. हे समाधानाचे गुण संतांमध्यें असतात, आणि इतरांत नसतात; बाकी, त्या दोहोंत दुसरें कांहीं अंतर नसतें, असें दर्शविण्यास श्रीधरानें ह्मटलें आहे:—

ओव्या.

**संत आणि इतर जन दिसती समसमान**
**परी संत सदा आनंदघन ब्रह्मानंदें डुल्लती. १.**
**बकांसंगें असतां मराळ दिसती सारिखे शुद्ध धवळ**
**परी क्षीर आणि जळ करिती वेगळें हंसची. २.**
**वायसांत वसे कोकिळ त्यांच्यासारखी दिसे केवळ**
**परी प्रवर्ततां वसंतकाळ पंचमस्वरें आळविती. ३.**

जंबुकवनांत वाढला केसरी परी त्याची कैंची पावेल सरी
क्षणमात्रें गज विदारी हांके भरी निराळ. ४.
स्फटिकांत मुक्ताफळ जाण दिसे सारिखें समसमान
मुक्त जोहरि काढिती निवडोन करिती जतन जीवेंसीं.५.
पाषाणांत परिस असे पूर्ण दिसे तैसाचि जड कठीण
परी तो करी लोहाचें सुवर्ण कृष्णवर्णा लपवोनी. ६.
कस्तूरी आणि मृत्तिका दिसे रंग एकसारखा
परी मृगमद सुवासें सकळिकां श्रीमंतासीं नीववी. ७.
तक्र दुग्ध एक वर्ण परी दुग्ध गोड सकळांसी मान्य
तैसीं संतांचीं रूपें जाण इतरांसमान न ह्मणावीं. ८.

आणखी, संतोष हा श्रद्धेवर अवलंबून असतो. रामदासांनीं एका ठिकाणीं ह्मटलें आहे:—

श्लोक.

आराधिलेंचि असतें जरि प्राप्त होतें
नाहीं असेंच मन साक्ष दिसोनि येतें
कष्टी कशास हृदयीं शिण कां धरावा
दाटून राग दुसऱ्यावर कां करावा.

खरेंच आहे. हें एवढें मनांत दृढ धरिलें, आणि विचार करून सर्व वस्तूंकडे पाहिलें, ह्मणजे जन्म सुखांत खचीत खचीत जाईल. त्याविषयीं दुसरी खटपट करावयास नको.

# १४.

## आज्ञावंदन हें कल्याण आहे.



सेनापति आणि त्यांच्या हाताखालचे समंजस अधिकारी ह्यांच्या ज्ञानांमध्यें फारसें अंतर नसतें; कधीं कधीं हाताखालच्या एकाद्या माणसास स्वतः सेनापतीपेक्षां अधिक कळत असतें. परंतु, कायदा असा असतो कीं, हाताखालच्या सर्व लोकांनीं सेनापतीची आज्ञा, हूं चूं न करितां, शिरसामान्य केली पाहिजे. हा नियम लष्करांत ज्या ज्या मानानें अधिक पाळितात, त्या त्या मानानें त्या लष्कराची तयारी अधिक असते, आणि त्यास युद्धामध्यें यश येण्याचा संभव अधिक असतो. संभव अधिक असतो, एवढेंच केवळ नव्हे, तर, यश खचीत येतें. पुष्कळ चतुर पुरुषांचें ह्मणणें असें आहे कीं, सोनपतपानपतच्या लढाईच्या वेळीं मराठ्यांच्या लष्करांत जर हा नियम चांगला चालत असता—भाऊसाहेब पेशव्यांच्या आज्ञेंत जर हाताखालचे सगळे सरदार असते—तर, अहमदशाहा अबद्दल्लीचा पराभव होऊन, मराठ्यांस खचीत यश आलें असतें. असो.

ह्यावरून सांगायाचें तात्पर्य असें आहे कीं, कुटुंबामध्यें, यजमानाच्या इतकीं, किंवा त्याहून थोडीं अधिक शाहाणीं जरी दुसरीं कितीही माणसें असलीं, तरी, त्यांनीं सर्वांनीं, आपला आग्रह एकीकडे ठेवून, त्या यजमानाच्या आज्ञेंत वागणें हें कुटुंबाच्या कल्याणास आवश्यक आहे. एका माणसाच्या ठायीं सगळे गुण कधीं सारखे नसतात. कोणामध्यें कांहीं असतो, कोणामध्यें कांहीं असतो. त्यांत यजमानामध्यें एक कांहीं तरी

विशेष गुण विशेष असावा, हें आवश्यक आहे. पण जरी तसा वेळेस नसला, तरी त्याचेठायीं जो गुण असेल त्यासच मोठा मानून त्याचा गौरव करून, त्याच्या आज्ञेंत राहणें हें बाकीच्या सर्व माणसांस—आणि त्यांत विशेषेंकरून गुणी माणसांस—अत्यंत भूषणास्पद होतें, आणि तें सर्व कुटुंबाच्या कीर्तीस आणि सुखास मोठें कारण होतें. पांडवांच्या चरित्राकडे पाहा. धर्मराज हा ज्येष्ठ बंधु होता, त्याचेठायीं क्षमा आणि धर्मशीलता हे गुण मोठे होते. त्याप्रमाणेंच, भीम ह्मणजे नवनागसहस्रबळी—मोठें शरीरबल त्याचेठायीं होतें. अर्जुन हा एवढा योद्धा होता कीं, त्याचे पुढें युद्धास उभें राहण्याची प्राज्ञा शंकरावांचून इतरांची नव्हती. आणखी शरीरबल आणि युद्धकौशल्य हे गुण कांहीं सामान्य नव्हत. क्षमा आणि धर्मशीलता ह्या गुणांपेक्षां हे कमी योग्यतेचे होते असें नाहीं. परंतु, धर्म हा आपला ज्येष्ठ बंधु, त्याची आज्ञा आपणांस शिरसावंद्य करावयाची, कांहीं झालें तरी त्याच्या आज्ञेबाहेर पाऊल ठेवावयाचें नाहीं, असा निश्चय भीम आणि अर्जुन ह्यांचा होता, त्याच्या योगानें त्यांस यश आलें, त्यांच्या चरित्रास पुष्कळ शोभा आली आहे, आणि त्यांचें चरित्र बोधप्रद झालें आहे. सती द्रौपदी हिची विटंबना सभेमध्यें दुर्योधन करूं लागला, तेव्हां भीमाच्या आंगाचा कल्पांत झाला, आणि तो ह्मणाला:—

### आर्या.

**रे सहदेवा सत्वर पुष्कळसा अग्नि आण जाच कसा**
**जाळूं याचे हे कर आह्मांला सोसवेल जाच कसा.**

मोरोपंत.

त्यावर धर्म कांहीं बोलला नाहीं. परंतु, अर्जुनानें त्यास ह्मटलें:—

## आर्या.

सद्गुण सुसेव्य हा गुरु देवप्रिय यास जेंवि हार उनी
घालिसि तापांत कसा गति कोण पुढें स्वसत्व हारवुनी. १.
आह्मां व्यसनार्तांची धर्मस्थिति हेचि बाज पावेंगा
त्वां मोडावें न इला स्वस्वास्थ्यसुखार्थ बा जपावें गा. २.
हें काय बरें या गुरुघातें रिपु परम मुदित होतील
स्वमुखीं विष अमृतरस व्याळमुखीं कोण सुज्ञ ओतील. ३.

मोरोपंत.

तें भीमानें देखील ऐकिलें; आपला हेका धरिला नाहीं.

तरी, कर्णाची वल्गना ऐकून भीमाच्या पायांची आग मस्तकास गेली, आणि त्यानें गदेस हात घातला. त्या वेळचें वर्णन केलें आहेः—

## ओव्या.

भीमासि नावरे क्रोध तदा सांवरूनि करें आकर्षी गदा
ह्मणे कौरवांच्या शिरच्छेदा करीन आतां क्षणार्धें. १.
पांचाळीनें पाहतां विलोकून माझें हृदय जाहलें शतचूर्ण
दावानल जाळी तृणकानन तेंवि दुर्जन मारीन हे. २.
धर्म ह्मणे ऐक भीमा तिहीं पण करूनि जिंकिलें आह्मां
क्रोध आंवरीं करी क्षमा वेगें पाहें विचारून. ३.
तुज क्रोध नावरेच कदा तरी माझिये मस्तकीं प्रेरीं गदा
परी स्वधर्म सत्यमर्यादा सर्वथाही न सांडीं तूं. ४.
चळतील मेरुमांदार पश्चिमेस उगवेल जरी मित्र
हेंही अघटित घडेल परी सज्जन नर असत्य मार्गें न जाती. ५.
उष्णता धरील रोहिणीपती शिळेवरी कमळें उगवती
हेंही अघटित घडेल परि न वर्तती भगवद्भक्त असत्य पैं. ६.

श्रीधर.

असो. हें भाषण ऐकून भीमसेन जागचे जागीं स्वस्थ बसला.

ह्यावरून एवढें घ्यावयाचें कीं, कुटुंबामध्यें स्वास्थ्य आणि पराक्रमाचें सामर्थ्य राहाण्यास ऐक्य आवश्यक आहे. ह्मणजे सगळ्या माणसांचा जीव एक पाहिजे. असा जीव एक राहाण्यास श्रेष्ठ आणि कनिष्ठ ह्या दोहीं पक्षीं प्रयत्न झाले पाहिजेत. श्रेष्ठांनीं दोन गुण धरिले पाहिजेत; पवित्र अंतःकरण आणि क्षमा. ह्मणजे, कनिष्ठांच्या मनांत असें वागलें पाहिजे कीं, श्रेष्ठ आपलें जें काय ऐकत नाहींत, त्यास कारण कांहीं तरी चांगलें आहे—योग्य आहे. आणखी इतकें होऊनही, प्रसंगीं कनिष्ठांचे वाग्बाण निमूटपणें सोसण्यासारखी क्षमा पाहिजे. कनिष्ठांनीं एक गुण दृढ धरावा; तो हा कीं, प्रसंगीं आपलें ह्मणणें श्रेष्ठांस नम्रतेनें कळवायाचें, तरी, शेवटीं त्यांच्या इच्छेस सादर व्हावयाचें. असे गुण उभय पक्षांत आले, ह्मणजे कुटुंबांत कलह होण्याची भीति मुळींच राहावयाची नाहीं. ह्या सगळ्या गुणांत क्षमा हा गुण ह्या कामीं फार उपयोगीं पडतो. एकादे ठिकाणीं बंड उठलें, ह्मणजे, दारूगोळ्यांच्या किंवा सैन्याच्या संरक्षणास जीं स्थलें आयत्या वेळीं तयार करितात, त्यांच्या सभोंवतीं जी मोठी भित ह्मणजे कोट बांधितात, तो भक्कम कठिण दगडांचा बांधीत नसतात; तर भुसभुशीत मातीचा बांधीत असतात. ह्याचें कारण असें आहे कीं, बाहेरून शत्रूकडचे गोळे जर येऊं लागले, तर, ते, चिखलांत दगड जातो त्याप्रमाणें, त्या कोटांत घुसून जावे. हाच कोट जर कठिण दगडांचा भक्कम केला, तर, त्यावर असे गोळे आपटून, त्याचे तुकडे तुकडे उडतील, त्यांनीं त्रास होईल, आणि कदाचित कोटास भोंकेंही पडतील, असें भय असतें. ह्याचें तात्पर्य एवढेंच घ्यावयाचें कीं,

कठिणाकठिणाशीं गांठ पडूं दिली ह्मणजे कलह झाल्यावांचून राहात नाहीं. ह्मणून, कोणी एका पक्षानें पड—क्षमा—धरिली पाहिजे. आणि क्षमा धरणें हें श्रेष्ठ पक्षास विशेष शोभतें. ह्मणून, कुटुंबामध्यें, प्रसंग मुख्य माणसाशीं येवो किंवा इतरांत जेष्ठकनिष्ठांशीं येवो, श्रेष्ठानें क्षमा धरावी, हें भूषण आहे. त्याप्रमाणेंच, आज्ञावंदन हें कनिष्ठांस मोठें भूषण आहे.

आणखी एक गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, लोभ हें कलहाचें बीज आहे, आणि आत्मसंयमन हें शांतीचें बीज आहे. ह्मणून करवेल तितकें आत्मसंयमन करावें, दुसऱ्यास सुख देण्याचा प्रयत्न करावा, आपल्या सुखाकडे पाहूं नये. ह्यानें जी मौज कुटुंबव्यवस्थेमध्यें होते, ती दुसऱ्या कशानेंही होत नाहीं. ह्याचा अनुभव कुटुंबवत्सलांस आला आहे. त्याचप्रमाणें कांट्याचा नायटा करूं नये. कोणी प्रसंगीं कपटानें जरी एकादा मर्मभेदक शब्द बोललें तरी, तो ऐकला न ऐकला करून कौतुकावारी न्यावा. तो उगाळीत बसूं नये. कोळसा उगाळावा तितका काळाच निघावयाचा; त्यांतून कधीं निर्मळपणा निघावयाचा नाहीं.

शिवाय, आणखी एक गोष्ट येथें सांगावयाची आहे. ती आमच्या पुरुषमंडळीस मात्र सांगावयाची आहे. ती ही कीं, त्यांनीं, गृहव्यवस्थेच्या कामीं—आणि त्यांतही घरांतल्या बारीक सारीक खटपटींत—बायकांच्या बोलण्याकडे सहसा लक्ष देऊं नये. शिक्षण कमी असल्यामुळें ह्मणा किंवा, आमचे कवि समजतात त्याप्रमाणें, स्वभावतःच ह्मणा, बायकांच्या बोलण्यांत आणि वागण्यांत कलहाचें बीज पुष्कळ असतें. तें पुरुषांनीं मनावर घेतलें, ह्मणजे, त्याचा वृक्ष व्हावयास उशीर लागत नाहीं.

जे बापलेंक, भाऊभाऊ, किंवा चुलतेपुतण्ये विभक्त होतात, त्यांच्या गोष्टी जर ऐकिल्या, तर, विभक्तपणा होण्यास मुख्य कारण बायका असतात, असें दिसून येतें. "बायकाबायकांचें जमेना" हें कारण नेहमीं ऐकूं येतें. हें कांहीं खोटें नव्हे. आपल्या पुत्रास राज्य मिळवून देण्याच्या खटपटींत कैकेयीस वैधव्याचें देखील भय वाटलें नाहीं. पेशवाई मिळविण्याकरितां आनंदीबाई प्रत्यक्ष पुतण्यास ठार मारविण्यास चुकली नाहीं. नारायणराव दीन होऊन "काका काका" करीत पळत आला, तेव्हां राघोबाचें मन कळवळलें, पण आनंदीबाईच्या मनास द्रव आला नाहीं. असो. हीं मोठ्या प्रकरणांतलीं मोठीं उदाहरणें आहेत. तरी, स्त्रीस्वभावाचें स्वरूप लक्षांत येण्यास बस आहेत. आणखी, लहान लहान घरांमध्यें जे लहान लहान कलह होतात, त्यांत ह्या स्वभावाचें बीज त्याचप्रमाणें चांगलें दृश्यमान असतें. विभक्तपणा झालेला आहे, अशीं शंभर कुटुंबें जर घेतलीं, तर, त्यांतल्या नव्वद कुटुंबांच्या विभक्तपणास बायका कारण झालेल्या आहेत, असें आढळून येतें. ह्मणून ही सूचना येथें बुद्ध्या दिली आहे. हीवरून आमच्या स्त्रीमंडळानें आह्मांवर कोपायमान होऊं नये. खरा प्रकार आहे तो सांगितला आहे. ह्यांत प्रमाद झाला असल्यास त्यांनीं मला क्षमा करावी.

आणखी एका विशेष गोष्टीविषयीं थोडेंसें येथें सांगावेंसें वाटतें. आलीकडे पंचवीस चाळीस वर्षांत असा एक विषय निघाला आहे कीं, पुरुष आणि स्त्रिया ह्यांची योग्यता समान मानावी, आणि त्यांच्या अधिकारांमध्यें कोणत्याही प्रकारचें अंतर नसावें. प्रथमदर्शनीं असें वाटतें कीं, हें ह्मणणें अगदीं योग्य

आहे; त्यांत असत्याचा लेशही नाहीं. कां कीं, मनुष्यें तेथून सगळीं सारखीं—त्यांत पुरुष काय आणि बायका काय—त्यांत पुरुषालाच श्रेष्ठत्व कां असावें ? खरें आहे. बायकांपेक्षां पुरुषांस श्रेष्ठ कां मानावें, ह्यास कांहीं कारण नाहीं. परंतु, आह्मी असें ह्मणतों कीं हें मानण्यावर नाहीं; तर पुरुष आणि बायका ह्यांच्या खऱ्या योग्यतेवर आहे. पुरुष आणि बायका ह्यांची उत्पत्ति जगामध्यें बरोबर झालेली असावी, आणि त्यांच्यामधलें श्रेष्ठत्व, कनिष्ठत्व, त्यांच्या आंगच्या गुणांच्या मानानें, आपोआप स्थापित होऊन तें पुढें चालत आलें असावें. त्यांत मनुष्यांनीं बुद्ध्या केलेलें—कृत्रिम—असें कांहींएक नाहीं. उजवा हात आणि डावा हात हे दोन्ही हात एका माणसाचे असतात. त्यांतल्या एकाद्याविषयीं प्रतारणा करण्याचें कारण त्याला नसतें. तरी, उजवा हात श्रेष्ठ मानावा, आणि डावा हात त्याच्यापेक्षां कमी मानावा, हा स्वभाव सर्वत्र आहे. ह्यास कारण मनुष्याचा पक्षपातीपणा नव्हे; तर त्या हातांच्या आंगचें अधिक उणें कर्तृत्व कारण होय. हा प्रकार नैसर्गिक आहे; कृत्रिम नाहीं. त्याच न्यायानें, पुरुषांनीं कधीं एक सभा करून स्त्रियांस आपणांपेक्षां कमी मानण्याचा ठराव केला आहे, आणि त्याविषयीं शपथा घेतल्या आहेत, असें आढळत नाहीं. त्याप्रमाणेंच आपण पुरुषाधीन राहण्याविषयीं स्त्रियांनीं स्वसंतोषानें आणा वाहिल्या नाहींत. असें असतां, जिकडे पहावें तिकडे—स्त्रियांस पुरुषांइतकी विद्या शिकवितात त्या देशांतही—स्त्रिया चांगल्या विद्वान् होऊनही—त्या पुरुषाधीन राहत आहेत, अथवा पुरुषांस आपणांपेक्षां श्रेष्ठ मानीत आहेत, हें कसें ? ह्याचें उत्तर एवढेंच कीं, तें ईश्वरनिर्मितच आहे—ह्मणजे व्यवहारांत पुरुष श्रेष्ठ असावा, स्त्रीनें

कनिष्ठ असावें—अथवा स्त्रिया पुरुषाधीन असाव्या—अशी ईश्वरी योजना आहे. ती योजना बदलण्याचा प्रयत्न कोणीं करूं नये. स्त्रिया पुरुषांपेक्षां कमी योग्यतेच्या आहेत, ह्याचा अर्थ स्त्रिया पशु आहेत, त्यांस पाहिजे त्या रीतीनें वागवावें, असा आमचा आशय कोणीं समजूं नये. तर, आमचें ह्मणणें एवढेंच आहे कीं, पुरुष आणि स्त्री ह्या दोघांचीही योग्यता, त्यांच्या त्यांच्या कर्तव्याच्या मानानें, सारखीच आहे. तीं दोघें वेगळया वेगळया कार्यांकरितां परमेश्वरानें निर्माण केलीं आहेत. स्त्रिया गृहकृत्यांकरितां निर्माण केल्या आहेत, आणि पुरुष घराबाहेरच्या विशेष श्रमांच्या कामांकरितां निर्माण केले आहेत. त्यांनीं तीं कार्यें योग्य रीतीनें केलीं ह्मणजे तीं कृतकार्य झालीं ह्मणावयाचीं. त्यांत, एकंदरीनें, कर्तबगारी स्त्रीच्या ठायीं कमी असते. परंतु, तेवढ्यावरून तिची योग्यता कमी होत नाहीं. कार्याच्या संबंधानें ती एकसारखीच आहे. दूध पाण्यापेक्षां श्रेष्ठ आहे, ह्याविषयीं कांहीं वाद नाहीं. परंतु, पाण्याचें कार्य दुधानें भागावयाचें नाहीं. मोठ्या राजाच्या बागेंतलीं जरी फुलझाडें असलीं, तरी, तीं जगायास त्यांस पाणीच घातलें पाहिजे, दूध घालून चालावयाचें नाहीं. त्याप्रमाणेंच, कितीही उत्तम दूध असलें, तरी त्यांत मासे जगावयाचे नाहींत, त्यांस जगावयास पाणीच पाहिजे. सुईचें कार्य तरवारीनें व्हावयाचें नाहीं; तसें तरवारीचें काम सुईनें व्हावयाचें नाहीं. ह्यावरून सर्व समजावें. आणि स्त्रिया ह्या पुरुषांच्या बरोबरीच्या नाहींत, असें स्थापित झालें आहे, ही सगळी लबाडी पुरुषांची आहे, असें जें कांहीं माणसांच्या—कांहीं समजदार माणसांच्या देखील—मनांत शिरलें आहे, तें त्यांनीं सोडून द्यावें. आणखी, पुरुषाधीन राहणें—प्रपंचांत पुरुषास साह्य करणें

हेंच आपलें भूषण आहे, असें समजून, स्त्रीजनांनीं आनंदानें आपलीं कर्तव्यें करून घर संभाळावें, हें उभयपक्षीं हितावह आहे. ह्यास उदाहरणें सीता, द्रौपदी, तारामति इत्यादि अनेक आहेत. त्यांच्या कथा वाचून पाहाव्या.

हें जसें स्त्रीपुरुषांविषयीं झालें, तसेंच घरांतल्या लहान माणसांविषयीं आणि मोठ्या माणसांविषयीं आहे. इतर गोष्टी कशाही असल्या तरी वडील माणसांस अनुभव मोठा असतो; आणि त्यांच्या अंतःकरणांत सगळ्या कुटुंबाचें हित सर्वदा खेळत असतें. ह्मणून लहान माणसांनीं मोठ्या माणसांच्या आज्ञेंत वागत असावें, आणि तें भूषण मानावें हें योग्य आहे.



## १५.

## काळजी आणि चित्तस्वास्थ्य.



प्रपंचांत काळजी हें मोठें दुःख आहे. काळजी-सारखें दुसरें दुःख नाहीं. काळजी ह्या शब्दाची खरी उपपत्ति कांहीं असो; पण आह्मांला असें वाटतें कीं, काळजाला झोंबते ह्मणूनच ह्या भावनेला काळजी असें नांव पडलें असावें. आकस्मिकांची गोष्ट एकीकडे असूं द्या; परंतु, कोणतीही विपत्ति ध्या, काळजी हें तिचें आदिस्वरूप ठेविलेलेंच असतें. आणखी आह्मांला असें वाटतें कीं, परमार्थपर जन प्रपंचाला जे इतके भितात, त्यास मुख्य कारण काळजी आहे. कारण, काळजी ही काळीज खात असते; काळजाला तोडीत असते; आणि ती अशी तोडीत असते, तोंपर्यंत सगळा जीव तिजकडे गुंततो; त्याला कांहीं सुचत नाहीं; आणि तितका वेळ तो परमेश्वरभक्तीस अंतरतो—मुकतो; ही मोठी हानि होते; हिनें जीवाच्या परमार्थाचा नाश होतो; ह्मणून साधुजन काळजीस मनस्वी भितात; आणि हीं काळजी प्रपंचांत अतिशयित असते; ह्मणून त्यांस प्रपंच नकोसा वाटतो; ह्यांत कांहीं विशेष नाहीं.

काळजी ह्मणजे प्रत्यक्ष दुःख नव्हे—तर दुःखाचें भय—दुःखाची धास्ती होय—दुःखाचा चोपदार होय. आणखी हा चोपदार असा चमत्कारिक आहे कीं, त्याच्या महाराजांची स्वारी जरी मागाहून खरोखर येत नसली, तरी, केवळ कल्पनेनें हा माणसाच्या मागें लागतो. ह्याचें चांगलें प्रमाण, एकादा सांसर्गीक रोग मोठ्या झपाट्यानें जननाश करीत असला, ह्मणजे

त्या प्रसंगीं चांगलें पटतें. पटकीनें भराभर माणसें मरतांना दृष्टीस पडलीं, ह्मणजे, कुटुंबी मनुष्यास केवढी काळजी उत्पन्न झालेली असते, आणि त्याचें काळजास ती कशी तोडीत असते, हें त्याचें त्यालाच विचारिलें पाहिजे. त्याची कल्पना दुसऱ्यास करतां यावयाची नाहीं.

बरें, ही काळजी वाहून कांहीं उपयोग होतो काय? खरा उपयोग कांहींएक होत नाहीं. होणें जाणें सर्व परमेश्वराधीन आहे; आपणां माणसांच्या हातीं कांहींएक नाहीं; व्हावयाचें तें होतच आहे; हें सगळें आपणास ज्ञात आहे; पण, आपली काळजी चुकते आहे काय? नाहीं. ती तिळभरही चुकत नाहीं. ती वाहावी लागतच आहे.

पण असें कां व्हावें? काळजी वाहून कांहीं उपयोग होत नाहीं, ही गोष्ट जर खरी आहे, तर काळजी कां वाहावी? ह्याचें उत्तर असें आहे कीं, हें सगळें स्वभाववृत्तीचें फल आहे. जन्मास आल्यापासून माणसास काळजी वाहण्याची संवय लागते. ती त्याच्याबरोबर वाढत जाते; आणि स्थितिपरत्वें ती वेगळ्या वेगळ्या प्रकारची असते. वर्गांत मला उत्तरें कशीं सुचतील, ही काळजी विद्यार्थ्याला असते; आणि आपणास पैसा कसा मिळेल ही काळजी प्रपंची माणसास असते. कोणी माणूस आजारी असलें ह्मणजे, तें मरेल कीं काय, अशी काळजी लागते; युद्ध चाललें असलें ह्मणजे अपयश येईल कीं काय, अशी काळजी लागते; अगदीं प्राण जातेवेळीं, माझ्या मागें, माझ्या मुलांचें कसें होईल ही काळजी लागते. ही साधारण प्रपंची माणसाची गोष्ट झाली; पण, ज्यांनीं प्रपंच सोडून देऊन सगळें आयुष्य परमार्थसाधनांत घालविलें आहे, त्यांस देखील

आपणांस मुक्ति कशी मिळेल ह्याची काळजी लागते. ह्मणजे असें ह्मणावें लागतें कीं, आपलें जिणें काळजीनें भरलें आहे. तिजपासून मुक्तता थोडाबहुत वेळ मिळते, तेवढें सुख होतें.

क्षुधा ही एक प्रकारची पीडा आहे खरी; परंतु, तीस यथेच्छ भक्ष्य मिळाल्यावर जें सुख होतें, तें दुसऱ्या कशांतही सांपडत नाहीं. त्याप्रमाणें, एकाद्या गोष्टीविषयीं अतिशयित काळजी वाहात असावें, आणि ती गोष्ट मनाप्रमाणें होऊन, ती काळजी दूर झाली, ह्मणजे जें सुख होतें, हेंही कांहीं अप्रतिम असतें. कुटुंबांतल्या जिवलग मनुष्याच्या जीवावरचें दुखणें गेलें ह्मणजे किती बरें वाटतें, ह्याचा अनुभव बहुतेक सर्वांस आहे.

संतांचें एक ह्मणणें असें असतें कीं, फलाशा हें दुःखास मूळ कारण आहे. उद्योग करावा, आणि त्याचें फल देणें ईश्वराधीन आहे असें समजून, चित्त स्वस्थ ठेवावें, असा उपदेश ते करितात, तो अगदीं योग्य आहे. उद्योग करण्यापुरती काळजी असावी, फलाविषयीं नसावी. मनुष्य आजारी आहे, त्यास उत्तम वैद्याच्या स्वाधीन करणें आणि त्याची शुश्रूषा ठेवणें येथपर्यंत आपल्या काळजीची मर्यादा राहावी; तिच्या पुढें फलाशेकडे वळण्याची संवय तिला लावूं नये. ह्मणजे, हें थोडेंसें भक्तीसारखें आहे. मोक्ष प्राप्त होण्यास अमुक इतकी भक्ति पाहिजे, असें कांहीं प्रमाण नाहीं. नुसता नामाचा जप बस होतो, तशी लोहपिष्ठभक्षण करून तपश्चर्याही बस होते. ह्याचें तात्पर्य असें घ्यावयाचें कीं, मनुष्यानें आपल्या सामर्थ्यानुरूप करवेल तितकें चांगलें करावें, ह्मणजे त्यांत त्याचें सगळें कर्तव्य येतें. एकाद्यापाशीं एकच रुपया आहे, तो त्यानें गरीबांस धर्म केला, आणि एका राजानें आपणाजवळचे सगळे

दाहा कोटि रुपये गरीबांस धर्मार्थ वांटले, तर, त्यांत त्या दोघांसही पुण्य सारखेंच लागावयाचें; कमजास्त लागावयाचें नाहीं. तोच प्रकार, आपल्या कर्तव्याच्या संबंधानें, काळजीविषयीं समजावा.

आमची आई ह्मणत असे कीं, "व्याप तितका संताप." ह्मणजे जितका पसारा अधिक तितकी काळजी अधिक असते. बैराग्याला काळजी असते, पण एकट्या स्वतःविषयीं असते. आणि प्रपंची माणसाला काळजी दाहा बारा, किंवा कधीं कधीं चाळीस पन्नास माणसांची वाहावी लागते. बैराग्यास देवानें विचारिलें कीं, तुला काय पाहिजे, तर, त्याचें मागणें, मला मोक्ष दे, एवढ्यांत आटपतें; परंतु, प्रपंची माणसास तसें विचारिलें असतां, ह्याचें उत्तर किती लांब होईल, ह्याचा अजमास देखील करवत नाहीं. असें कां, तर, त्याच्या काळजीचा पसारा मोठा असतो. परंतु, विचारी पुरुष जे आहेत, ते हें सगळें मर्म जाणून, काळजी तर करतात, पण ती मर्यादित करतात, तिला आपल्या काळजास डसूं देत नाहींत, आणि तत्संबंधीं आपलीं कामें करून, कसाही प्रसंग आला तरी आनंदवृत्ति राहतात.

सिद्नी स्मिथ ह्या नांवाचा एक धर्मोपदेशक इंग्लंडांत होता. त्यानें वृद्धापकाळीं आपल्या एका मित्राला लिहिलें कीं, "मला संधिवात, दमा आणि दुसरे सात रोग ह्यांची पीडा आहे. बाकी माझी प्रकृति बरी आहे." बाकी बरी ती काय?

जर्मी टेलर ह्या पुरुषाचें, इंग्लंडांतल्या राज्यक्रांतीच्या गोंधळांत सगळें नाहींसें झालें होतें, तरी त्या स्थितींत त्यानें आपल्या मित्रास लिहिलें कीं, "मी प्रजासत्ताकपक्षाच्या लोकांच्या

हातीं सांपडलों आहें, आणि माझें सर्व कांहीं गेलें आहे. आतां काय? तरी बरें. त्यांनीं सूर्य, चंद्र, माझी आवडती बायको, माझी कींव येते असे कांहीं मित्र, आणि मला साह्य करण्यास तयार असे कांहीं मित्र हीं त्यांनीं राहूं दिलीं आहेत, हें फार चांगलें आहे. माझी आनंदवृत्ति मजपाशीं आहे. त्याप्रमाणेंच धर्माच्या योगानें जें समाधान होतें, तें मला आहे. इतक्या सुखांत थोडेंसें दुःख असलें ह्मणून काय झालें? त्याविषयीं कशाला कुरकुरावें!"

**भय हरिजनीं कांहीं न धरावें मनीं. १.**
**नारायण ऐसा सखा काय जगाचा हा लेखा. २.**
**चित्त वित्त हेवा समर्पूनी राहा देवा. ३.**
**तुका ह्मणे मन असों द्यावें समाधान. ४.**

**भयाची तों आह्मां चित्तीं राहों खंती सकेना. १.**
**समर्पिलों जीवेंभावें कशा भ्यावें कारणें. २.**
**करील तें कवतुकें अवघें निकें शोभेल. ३.**
**तुका ह्मणे माप भरूं दिवस सारूं कवतुकें. ४.**

मनास कोणत्याही प्रकारची काळजी नसणें हें चित्तस्वास्थ्य होय. आणखी कांहीं माणसें अशा वृत्तीचीं असतात कीं, प्रयत्न करून युक्तीनें आपलें चित्तस्वास्थ्य राखितात.

आह्मी एकदा प्रवासास गेलों होतों. तेव्हां आह्मांबरोबर एक आमचा मित्र होता. तो मोठा मनमिळाऊ आणि नित्य संतुष्ट असे. गांवास जावयाचें होतें तेथें जाऊन काम करून परत आपले गांवीं येऊं लागलों, आणि वाटेंत एका नदीवर फराळ करायास उतरलों. तेथें दशम्या बाहेर काढण्यास गांठोडीं

सोडिलीं तेव्हां त्या मित्रास त्याची बनात कोठें दिसेना. आणि तीविषयीं तो मला विचारूं लागला. त्याला मीं सांगितलें कीं, वळकट्या सोडून पाहा, ह्मणजे ती त्यांत कदाचित् सांपडेल. त्याप्रमाणें तो वळकट्या उघडायास उठला, आणि इतक्यांत त्याचा विचार फिरून, तो परत दशम्यांचा डबा उघडूं लागला. त्याला मीं विचारिलें कीं, वळकट्या पाहाण्याचें टाकून आधीं खावयास कां लागलां? त्यानें उत्तर केलें कीं, "बनात वळकट्यांत कदाचित् सांपडेल असें सध्या वाटत आहे, तोंपर्यंत फराळ थोडाबहुत तरी जाईल; पण, त्यांत ती नाहीं असें स्पष्ट कळलें ह्मणजे मग एक घांस देखील जावयाचा नाहीं. ह्मणून आधीं खाऊन घेतों, आणि मग वळकट्या उघडीन."

त्याप्रमाणेंच एकदा एक गलबत बुडूं लागलें. तेव्हां त्यांतलीं सगळीं माणसें घाबरून जाऊन रडूं लागलीं. असा सगळा आक्रोश चालला असतां, कोणीएक माणूस, स्वस्थ निजून घोरत आहे, असा एकाच्या दृष्टीस पडला. त्यास त्यानें मोठ्या घाईनें उठविलें, आणि काय चाललें होतें तें सगळें सांगितलें. तें ऐकून, तो जागा झालेला माणूस त्यावर अतिशयित संतापला, आणि ह्मणाला, "तूं मला उठवलेंस कशाला? मी स्वस्थ निजलों होतों, तो बरा होतों. मीं उठून आतां आक्रोश केल्यानें किंवा प्रार्थना केल्यानें गलबत बुडायाचें राहील काय? मला तूं उगाच कां त्रास दिलास?"

गोष्ट खरी आहे. चित्त स्वस्थ असल्यावांचून अन्न गोड लागत नाहीं, हा अनुभव सर्वांस आहे. परंतु, प्रपंचांत चित्तस्वास्थ्यास किती तरी विघ्नें असतात. त्यांतलीं कांहीं खरीं असतात, आणि कांहीं उगाच काल्पनिक असतात. एकादी गोष्ट

अनिष्ट झाल्याचें समजलें ह्मणजे चित्तस्वास्थ्य नाहींसें होणें हें साहजिक आहे. आपलें कोणी जिवलग माणूस गत झालेलें कळणें, हें चित्तस्वास्थ्यभंगास प्रत्यक्ष कारण आहे, त्याचें निवारण कोणाच्यानें व्हावयाचें नाहीं. परंतु, उगाच रिकामपणीं पुढच्या अरिष्टांच्या कल्पना करीत बसणें आणि त्यांवरून आपलें चित्तस्वास्थ्य मोडणें हें वेडेपण आहे. केव्हां काय संकट येईल ह्याचा नियम नाहीं, ही गोष्ट खरी आहे. तरी, आतां धरणीकंप होईल कीं काय, आतां वीज पडेल कीं काय, आतां आपणास एकादा मोठा रोग पछाडील कीं काय, अशा कल्पना मनांत आणून भिणें किंवा चिंताक्रांत होणें हें मूर्खपण आहे. त्याप्रमाणेंच, मागें जीं महासंकटें भोगलीं असतील, त्यांचें स्मरण करून दुश्चित्त होणें हेंही मूर्खपण आहे. स्मरणशक्तीचा तो योग्य उपयोग नव्हे. गत गोष्टी मनांत आणून चित्तस्वास्थ्याचा भंग करणें ह्यांत काय शाहाणपण आहे?

गत गोष्टींच्या स्मरणानें किंवा भावी गोष्टींच्या कल्पनेनें आपलें चित्त हर्षित किंवा चिंताक्रांत होऊं देऊं नये. प्रकृत प्रसंगांत काय करणें योग्य आहे, हें नीट पाहून तें करण्याचा उपक्रम ठेवावा. आयुष्य फार अल्प आहे, तें फार बेतानें खरचिलें पाहिजे. तें उगाच मागच्या आठवणींत अथवा पुढच्या कल्पनांत खरचिण्यास पुरावयाचें नाहीं. प्रपंचांत जसा प्रसंग प्राप्त होईल, तसें वागण्यास तयार व्हावें. त्यांत मात्र सारासार विचार ठेवावा. त्यामध्यें आपल्या सुखाकडे ओढा ठेवूं नये, तर सत्कृत्याकडे ओढा ठेवावा. माझा एक फार मोठा मित्र[1] होता. तो फार शिकलेला नव्हता; तरी, त्याला व्यवहारचातुर्य

[1] कै० वा० जावजी दादाजी चौधरी.

फार मोठें होतें. त्याचा लोभ मजवर अतिशयित असे. त्यास मीं माझ्या नातवाच्या मुंजीस पानसुपारीस बोलाविलें होतें. आणि तो खचीत यावयाचा, अशी माझी खातरी होती. परंतु, तो इकडे निघून यावयाच्या वेळेस, त्याच्या जातींतला कोणी फार गरीब माणूस गत झाल्याचें वर्तमान त्याला कळलें. तेव्हां त्यानें मजकडे स्वतः येण्याचा विचार रहित केला, आपण स्वतः त्या मर्तिकाला गेला, आणि त्यानें मुंजीच्या पानसुपारीस आपल्या उभयतां चिरंजीवांस पाठवून दिलें. आणि दुसरे दिवशीं माझी गांठ पडल्यावर, न येण्याचें कारण त्यानें मला सांगितलें, आणखी असें दर्शविलें कीं मुंजीच्या पानसुपारीस जाण्यापेक्षां त्या गरीबाच्या मर्तिकास जाणें मला बरें वाटलें, ह्मणून मी तिकडे गेलों. ही गोष्ट अल्प आहे, परंतु फार विचार करण्यासारखी आणि लक्षांत ठेवण्यासारखी आहे. एकेच वेळीं अनेक गोष्टी करण्याचे प्रसंग माणसास कधीं कधीं येतात. त्यांतली कोणती गोष्ट आधीं करावी, आणि कोणती मागें राहूं द्यावी, हें कळलें पाहिजे. माझ्या मित्रानें बोलतां बोलतां असें दर्शविलें कीं, मुंजीच्या पानसुपारीला येणें हें संध्याकाळपर्यंत साधण्यासारखें असतें; आणि जेथें मित्रत्व आहे, तेथें तें दुसरे दिवसापर्यंत लोटलें तरी चालतें. परंतु, मर्तिकाचें काम जें आहे, तें, असें मग साधण्यासारखें नसतें. तें त्याच वेळेस व्हावयाचें असतें. आणखी मुंजीलग्नाचीं कार्यें जीं आहेत, तीं माणसांकडे वारंवार होत असतात. त्यांस आधीं मागें जातां येतें. पण मर्तिक जें आहे, तें माणसास एकदाच येतें, आणि हें शेवटचें असतें; त्यानंतर त्या मनुष्याचा कांहींएक संबंध राहात नसतो; ह्मणून तें आधीं साधणें अवश्य आहे. हें अगदीं खरें आहे. हें

प्रपंचांत कधीं कधीं फार चुकतें; आणि ती चुकी मग कधींही सुधारतां येत नाहीं. आणखी तीमुळें आलेला मूर्खपणा निमूट-पणें वाहावा लागतो. ह्याकरितां ह्याविषयीं जपलें पाहिजे.

ह्याच्या उलट एक उदाहरण आहे. आमच्या एका ओळ-खीच्या गृहस्थाचें एक लहानसें मूल कांहीं रोग होऊन वारलें. त्यामुळें त्यास आणि त्याच्या बायकोस फार दुःख झालें. परंतु त्यास आठचार दिवस लोटले नाहींत तोंच गांवांत एक नवें नाटक आलें. आणि त्या गृहस्थाच्या बायकोस नाटकाची आ-वड अतिशयित असल्यामुळें, ती त्या नाटकास गेली. तेव्हां तिला विशेष कांहीं वाटलें नाहीं. परंतु तेथून घरीं आल्यावर, तिचें मन तिला खाऊं लागलें. ती दुसऱ्या माणसांस विचारूं लागली कीं, नुकतें माझें मूल गेलें असून मी नाटकाला गेल्यें, ह्याबद्दल लोक मला नांवें ठेवतात काय? ही गोष्ट तिच्या मनाला ला-गून राहिली. आणि नाटकास गेल्यानें तिला जी क्षणभर मौज वाटली, तिच्या शंभरपट संकोच आणि लाज तिला कितीएक दिवस वाहावी लागली.

परमार्थ्याच्या दृष्टीनें ह्मटलें ह्मणजे, बाह्योपाधीनें चित्तास कोणत्याही प्रकारची विकृति न होणें—लाभ झाला असतां आनंद न होणें आणि हानि झाली असतां दुःख न वाटणें—हीच मुक्ति होय. ह्मणजे, पाऊस पुष्कळ पडल्यानें वाढत नाहीं, आणि पुष्कळ अवर्षण पडल्यानें कमी होत नाहीं, अशी समुद्राची स्थिति आहे, तशी मनाची स्थिति होणें हीच मुक्ति होय. हें साधणें फार कठिण आहे. कां कीं, जन्मास आल्यापासून, सगळा संस्कार ह्याच्या उलट चालत असतो. तो जन्माचा अभ्यास एकीकडे ठेवून, त्याच्या विपरीत मनाचा निग्रह करणें हें स्वभावाचा स्वभाव बदलणें

आहे. परंतु, असा अनुभव आला आहे कीं, हें जरी अगदीं पूर्णपणें साधलें नाहीं, तरी, अभ्यासानें थोडें तरी साधतें. ह्याचें मोठें उदाहरण साक्रेटिसाचें आहे. तो मुखचर्येवरून फार दुष्ट मनुष्य दिसे. त्यावरून त्यानें एका प्रसंगीं असें स्पष्ट सांगितलें कीं, मी स्वभावतः फार दुष्ट आहें, ही गोष्ट खरी आहे. परंतु, अभ्यास ठेवून तें दुष्टपण मीं दाबून टाकिलें आहे, आणि अभ्यास ठेवूनच सद्गुण वाढविले आहेत; ह्मणजे मी जो सद्गुणी आहें, तें सगळें अभ्यासाचें फळ आहे. आणखी साक्रेटिस हा बोलला त्यांत असत्य एक लवही नाहीं. असें जर आहे, तर, त्याच्या अनुकरणानें कोणत्याही माणसास आपले दुर्गुण सोडतां येतील आणि अंगीं सद्गुण वाढवितां येतील. आणि चित्तस्थैर्य हा एक सद्गुण त्यांतलाच आहे. आणि तो खऱ्या सुखाचा मुख्य आधार आहे. तो संपादण्याविषयीं यथाशक्ति प्रयत्न करावा, हें आपलें कर्तव्य आहे.



## १६.

## परमेश्वरभक्ति.



ऐहिक मदाच्या भरानें मनुष्यें कांहीं समजोत, आणि कांहीं ह्मणोत, मनुष्याच्या आटोक्यांत नाहीं, अशी अद्वितीय शक्ति ह्या जगामध्यें आहे, तिचा संचार सर्वत्र आहे, आणि तीस आपणां सर्वांस मान्य व्हावें लागतें, ही गोष्ट समजदार माणसांनीं प्रांजळपणें कबूल केलीच पाहिजे. ती शक्ति तोच परमेश्वर होय. त्याच्या इच्छे-वांचून त्रिभुवनामध्यें एक पान देखील हालत नाहीं. डोळ्यांवर तारुण्याची धुंदी असते, तोंपर्यंत, झिंगलेल्या माणसास जमीन न दिसावी त्याप्रमाणें, ही शक्ति माणसास—ह्मणजे त्याच्या ज्ञान-चक्षूंस दिसत नाहीं. परंतु, दुःखांजन डोळ्यांत पडलें, ह्मणजे ती शक्ति आपोआप दृश्यमान होते.

शिकंदर बादशाहाला वाटत होतें कीं, मी देव आहें. पण, एका किल्ल्याची पाहाणी करीत असतां त्याच्या पायास बाण लागून त्याच्या वेदना त्याला होऊं लागल्या, तेव्हां त्याला वा-टलें कीं मी माणूस आहें, देव नाहीं.

नेपोलियन बोनापार्टास वाटत होतें कीं, अशक्य असें जगांत कांहीं नाहीं; प्रयत्न केला असतां सर्व कांहीं होण्यासारखें आहे. परंतु, पराभव झाल्यावर आणि प्रतिबंधांत पडल्यावर त्याचे डोळे उघडले, आणि भवितव्य ह्मणून कांहीं आहे, असें त्याला चां-गलें समजलें.

अशीं उदाहरणें पुराणांतरीं अनेक आहेत. त्यांवरून एवढें

समजावयाचें कीं, देव नाहीं असें जें माणसाला वाटतें तें भ्रांतिमूलक आहे.

शिवाय, दुसरें असें आहे कीं, ज्या विषयांत ज्याची पारंगतता विशेष असते, त्या विषयाच्या संबंधानें त्याचीं मतें विशेष ग्राह्य असावीं हें योग्य आहे. गणिताच्या संबंधानें भास्कराचार्यांचें मत निर्विवाद ह्मटलें पाहिजे; व्याकरणासंबंधानें पाणिनीचें मत निर्विवाद ह्मटलें पाहिजे; पदार्थविज्ञानशास्त्रासंबंधानें सर ऐझाक न्यूटनाचें मत निर्विवाद ह्मटलें पाहिजे; राज्यस्थापन आणि राज्यरक्षण ह्यांच्या संबंधानें बाबर, शिवाजीमहाराज, इत्यादिकांचीं मतें निर्विवाद ह्मटलीं पाहिजेत; त्याप्रमाणें परमेश्वरभक्तीच्या संबंधानें व्यास, वाल्मीकि, तुकाराम, रामदास इत्यादिकांचें मत निर्विवाद ह्मटलें पाहिजे. त्यांचें मत पाहायास लागावें तों असें दिसतें कीं, मनुष्यास इहपर सुख साधण्यास परमेश्वरभक्तीसारखें सुलभ असें दुसरें एकही साधन नाहीं, असें त्यांस वाटत होतें. ह्याविषयींची साक्ष त्यांच्या चरित्रांवरून आणि त्यांच्या काव्यांवरून उत्तमप्रकारें पटत आहे. तुकारामाचें उदाहरण बस आहे. तुकाराम हा मनुष्य कुटुंबी होता. त्याला बायकामुलें होतीं. पण, त्याचें लक्ष त्यांच्या संगोपनाकडे नसे, हरिभक्तीकडे असे. तें एवढ्याचकरितां कीं, कुटुंबभरणांत जें सुख वाटतें त्यापेक्षां परमेश्वरभक्तींत अधिक वाटतें, असें त्याच्या अनुभवास आलें होतें. ह्मणून तो ऐहिक मानापमानाची आणि सुखदुःखाची फारशी परवा करीत नसे. त्याचे बायकोनें त्याला जे टोमणे मारिले, त्यांचे त्यानें अभंग केले आहेतः—

### अभंग.

काय नेणो होता दावेदार मेला वैर तो साधीला होउनि गोहो.
किती सर्व काळ सोसावें हें दुःख किती लोकां मुख वांसुं तरी.
तुका ह्मणे येती बाइले आसडे फुंदोनियां रडे हांसे कांहीं. ३.

आतां पोरा काय खासी गोहो झाला देवरशी. १.
डोचकें तिंबी घातल्या माळा उदमाचा सांडी चाळा. २.
आपल्या पोटा केली थार आमचा नाहीं वेसपार. ३.
हातीं टाळ तोंड वांसी गाय देउळीं देवापाशीं. ४.
आतां आह्मी करूं काय न बसे घरीं राना जाय. ५.
तुका ह्मणे आतां धीरी अझून नाहीं जालें तरी. ६.

ह्यावरून त्याच्या घरची स्थिति कशी होती, आणि त्याला किती जाच होत असे तें लक्षांत येईल. आतां हा इतका जाच त्यानें कां सोशिला, ह्याचें उत्तर एवढेंच कीं, त्याला कुटुंबापेक्षां भक्तींत सुख विशेष वाटत होतें. त्यानें ह्मटलें आहे:—

### अभंग.

भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं तया घरीं शांति क्षमा दया. १.
अष्टमहासिद्धि ओळगती द्वारीं नच जाती दुरी दवडीतां. २.
तेथें दुष्टगुण न मिळे निःशेष चैतन्याचा वास जयामाजी. ३.
संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ तुटली हळहळ त्रिगुणाची. ४.
तुका ह्मणे येथें काय तो संदेह आमचे गौरव आह्मी करूं. ५.

भक्तीवीण जळो जिणें लाजिरवाणें संसार भोगणें दुःखमूळ. १.
वीस लक्ष योनी वृक्षांमाजी घ्याव्या जलचरीं भोगाव्या नवलक्ष.
अकरा लक्ष योनी किड्यांमाजी घ्याव्या दशलक्ष भोगाव्या पक्ष्यांमाजी.

तीस लक्ष योनी पशूचिये घरीं मानवां भीतरी चार लक्ष. ४.
एक एक योनी कोटि कोटि फेरा मनुष्य देहाचा वारा मग लागे.
तुका ह्मणे तेव्हां नरदेह नरा तयाचा मातेरा केला मूढें. ६.

भीत नाहीं आतां आपुल्या मरणा दुःखी होतां जना न देखवे. १.
आमुची तो जाती ऐसी परंपरा कां तुह्मी दातारा नेणा ऐसें. २.
भजनीं विशेष तेंचि पैं मरण नव जावा क्षण एक वायां. ३.
तुका ह्मणे नाहीं आघाताचा वारा ते स्थळीं दातारा ठेव मातें. ४.

आणखी, साधूंचें ह्मणणें असें आहे कीं, परमेश्वरप्राप्तीस उत्तम संधि ह्मटली तर मनुष्यजन्म आहे. तो जर भलत्याच कामांत खरचिला, तर मोठी हानि होते, आणि पदरीं मूर्खत्व येतें तें वेगळेंच.

ओंव्या.

ह्मा नरदेह उत्तम पूर्ण केवळ भगवत्प्राप्तीचें कारण
म्यां आत्महित न करून बुडालों कीं अंध तमीं. १.
पुण्य क्षेत्र सरसाविलें तेथें कनकबीज लाविलें
कनकाचें ताट घडिलें त्यांत वाढिलें तृणबीज. २.
सुधारसकुंभ दैवें जोडला तो नेऊनि उकिरडा ओतला
चिंतामणी फोडोनि घातला पायरीस अभाग्यें. ३.
सुरभी शोधीत आली घर तिशीं मारूनि काष्ठप्रहार
अभाग्यें घातली बाहेर-तोच प्रकार मज जहाला. ४.
बळें कल्पवृक्ष तोडून वाढविलें कंटकवन.
राजहंस दवडून दिवाभीत पाळिले. ५.

श्रीधर.

हें खरें. पदार्थविज्ञानवादी कांहीं ह्मणोत, परंतु ही गोष्ट खरी

आहे कीं, परमेश्वरभक्ति करणें जी आहे, "ती मनुष्यजन्मावांचून दुसऱ्या कोणत्याही जन्मांत साधते अशी दिसत नाहीं. इतर जीवांस मुळीं परमेश्वराची ओळखच नाहीं. मग त्याची भक्ति कोठून असणार ?

आतां, परमेश्वरभक्ति करावी कोणत्या प्रकारें, हा एक मोठा प्रश्न आहे. आणि त्याचीं पुष्कळ अंगें आहेत. परंतु, त्या सर्वांची एकवाक्यता एका गुणांत आहे. तेवढा गुण त्यांतला घेतला, ह्मणजे सगळें साधतें. तो गुण ह्मटला ह्मणजे खरी भक्ति—आपल्या अंतःकरणास खरी भक्ति वाटते ती—परमेश्वरास अमक्या एका उपायानें संतोष होतो असें कळल्यावर तो उपाय दृढतर निश्चयानें करणें हीच खरी भक्ति होय. मग तींत लोकदृष्टीस कांहीं चूक दिसली, तरी चिंता नाहीं. परमेश्वर सर्वज्ञ आहे. त्याला आपलीं मनोगतें कळत असतात. आणि तो मनोगतांस ओळखून त्यांवरून आपल्या भक्तीच्या खरेपणाचें तारतम्य बसवितो. लहान मूल असतें; तें बापास दादा किंवा भाऊ ह्मणतें, किंवा कधीं नांवानेंही हाक मारितें. तेवढ्यावरून बापास राग येत नाहीं. कां कीं, त्या हाक मारण्यांत कांहीं नाहीं, मुलाचें प्रेम आपणावर आहे, हें त्यास ठाऊक असतें, आणि त्यावरून तो त्यावर प्रेम करीत असतो. तसें परमेश्वर आणि भक्त ह्यांच्याविषयीं समजावें. त्याचें लक्ष निष्ठेकडे असतें, कृतीकडे नसतें.

भक्तिभावानें त्याला कोणी देव ह्मणो, अल्ला ह्मणो, ख्रिस्त ह्मणो, कीं दुसऱ्या कोणत्या नांवानें हाक मारो; तो हाक देतो.

कोणी डोळे मिटून आकाशांतला बाप ह्मणून प्रार्थना करोत, रामा रामा ह्मणून धांवा करोत, तो साह्य करितो.

कोणी टाळमृदंगांच्या नादानें त्याला आळवोत, किंवा नुसत्या अंतःकरणस्थ प्रेमानें त्याचें भजन करोत, तो पावतो.

सारांश, "देव भावाचा भुकेला" हें तत्व आहे. आणखी भावाविषयीं तुकोबांनीं ह्मटलें आहेः—

**अभंग.**

**भाव धरी तया तारील पाषाण दुर्जना सज्जन काय करी. १.**
**करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ खापरा परीस काय करी. २.**
**काय करिल तया साकरेचें अळें बीज तैशीं फळें येती सदा. ३.**

बाकी, देवाची सेवा आपण माणसें ती काय करणार, आणि त्याला तिची काय गरज आहे? परमेश्वरानें अर्जुनास ह्मटलें आहेः—

**श्लोक.**

**खरारा खगेंद्रासि माझ्या कराया**
**न कोणी मला पाहिजे लोकराया**
**न लागे तया घांस दाणा न पाणी**
**उभा जो पुढें नित्य जोडोनि पाणी. १.**
**लगामाविणें माझिया जो लगामीं**
**विना जीन वाहे मला व्योमगामी**
**अशा वाहनालागिं तो मानसाची**
**अपेक्षा नसे गोष्टि हे मान साची. २.**

असें आणखी पुष्कळ प्रकारीं सांगून शेवटीं ह्मटलें आहेः—

**श्लोक.**

**सकल लौकिक वैदिक पांडवा**
**मज समर्पुनि तूं करिं तांडवा**

करिसि भक्षिसि होमिसि जें खरें
मजमधेंचि समर्पित तें शिरे. १.

वामन.

शिवाय कृष्णांनीं सुदाम्यास ह्मटलें आहेः—

श्लोक.

तिळभरि जरि भक्तें अर्पिलें वस्तु कांहीं
बहुतचि मज होतें प्रेमभावेंचि पाहीं
बहुतहि दिधलें कीं भक्तिहीनें मला जें
अणुचि गमतसे तें चित्त तोषे न माझें. १.

वामन.

तात्पर्य सांगावयाचें एवढेंच कीं, घरांतलीच वस्तु, पण ती लहान मुलानें प्रेमपूर्वक आपल्या बापास दिली, ह्मणजे त्याला आनंद होतो. तसा भक्तीचा प्रकार आहे.

आणखी परमेश्वरभक्ति ही मोठी विश्रांति आहे. प्रपंचांत अनेक व्याधि असतात; आणि परमेश्वरभक्तींत व्याधि मुळींच नसते. प्रपंचांतल्या सुखास क्षयाची भीति असते; परमेश्वरभक्तींतल्या सुखास क्षयाची भीति नसते; कां कीं, त्या सुखास क्षयच नाहीं. हा सिद्धांत सर्व धर्माच्या शास्त्रांत आहे. आणि त्याचा अनुभव त्यांतल्या साधूंस आला आहे. ह्मणून, प्रपंचांतल्या श्रमांनीं शिणल्यावर विसावा घेण्याकरितां तरी परमेश्वरभक्ति करावी.

आतां, आस्तिक आणि नास्तिक ह्यांतला खरा पक्ष कोणता, ह्याचा निर्णय प्रत्यक्षतः तर कोणाच्यानें करवायाचा नाहीं. सगळा वाद कोटिक्रमावर चालावयाचा आहे. त्यांत उभय पक्षीं साधक बाधक प्रमाणें पुष्कळ आहेत. तीं असोत, परंतु, त्यांतला

सुरक्षित पक्ष कोणता, ह्याचा विचार करितांना जें एक भाषण एका ईश्वरवाद्यानें अनीश्वरवाद्याशीं केलें, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तें हें:-"देव मुळीं नसला, तर, मृत्यूनंतर तुला कांहीं नाहीं, आणि मला कांहीं नाहीं. पण, जर देव असला, तर मग तुझी गत काय?" तें ऐकून नास्तिकास वाईट तोंड करून स्वस्थ बसावें लागलें.

परमेश्वरभक्ति हा एक मोठा आधार आहे. मनुष्यास उभें राहाण्यास खरोखर हातभर जागा लागते. तेवढीच जागा शें दोनशें हात उंचीवर तयार केली, तर तेथें कोणाच्यानेंही उभें राहावयाचें नाहीं; पडायाचें भय वाटेल. पण तसें जमिनीवर होत नाहीं. पडलों तरी भोंवतालच्या जमिनीवर सांवरूं, असा त्यांस विश्वास असतो. तसा परमेश्वरभक्ति हा विश्वास ठेवण्यास एक मोठा आधार आहे. आपण पातकी आहों. आपणांस पावलोपावलीं दुःखें व्हावयाचीं आहेत, हें आपणांस ठाऊक आहे. तरी, दुःखापासून तारण्याचें ज्यास सामर्थ्य आहे, त्याची भक्ति आपण करीत आहों, तेव्हां तो दयानिधि अनंत उपायांनीं—किंवा केवळ इच्छामात्रें—आपणांस त्या दुःखांपासून तारील, असा भरंवसा भाविकांस असतो; तो भरंवसा अभाविकांस नसतो. ह्मणून आह्मी असें ह्मणतों कीं, परमेश्वरभक्ति हा एक मोठा आधार आहे. समर्थांनीं ह्मटलें आहे:—

### ओव्या.

**देवाच्या इच्छेनें वर्तावें देव करील तें मानावें**
**मग सहजाचि स्वभावें कृपाळू देव. १.**
**पाहतां देवाचे कृपेसी मातेची कृपा कायसी**
**माता वधी बाळकासी विपत्तिकाळीं. २.**

देवें भक्त कोण वधिला कधीं देखिला ना ऐकिला
शरणागतासि देव झाला वज्रपंजरू. ३.
देव कृपेचा सागर देव कृपेचा जलधर
देवासि भक्तांचा विसर पडणार नाहीं. ४.
देव प्रीति राखणें जाणें देवासी करावें संगपणें
जिवलगें अवघीं पिशुनें कामा न येती. ५.
सख्य देवाचें तुटेना प्रीति देवाची विटेना
देव कदा पालटेना शरणागतासी. ६.
ह्मणूनि सख्य देवासीं करावें हितगुज तयास सांगावें
आठवे भक्तीचें जाणावें लक्षण ऐसें.

दासबोध.

कोणत्याही धर्मांत पाहिलें, तर हाच मुख्य भक्तिमार्ग सांगितला आहे. ह्याचें अवलंबन करावें. ह्यांत हित आहे.



## १७.

## महत्वाकांक्षा.



प्रपंचांत ज्या गुणांच्या योगानें हातून सत्कृत्यें घडतात, त्यांत महत्वाकांक्षा हा गुण मुख्य होय. आपण मोठें व्हावें, आपला मोठा लौकिक व्हावा, आपण लोकांस वंद्य व्हावें, अशी जी इच्छा माणसांच्या मनांत अवतरते, तिला महत्वाकांक्षा ह्मणतात. ही महत्वाकांक्षा, बेताबाहेर न जाऊं देतां, तिजपासून होईल तर चांगलें व्हावें, वाईट कांहीं होऊं नये, अशा मर्यादेंत ठेविली, तर तिचा उपयोग स्वतः माणसास आणि जगास फार होतो. आणखी जगामध्यें जीं काय सत्कार्यें घडलेलीं आपणांस दिसत आहेत, त्यांच्या बुडीं ही महत्वाकांक्षा, कोणत्यानाकोणत्या दुसऱ्या रूपानें असतेच असते. अभिमान हें एक महत्वाकांक्षेचेंच स्वरूप आहे. आपणांस कोणीं कमी समजूं नये, अशी इच्छा असणें हा एक प्रकार त्यांतलाच आहे. भारती युद्धाच्या वेळीं दुर्योधनानें शल्यास कर्णाचें सारथ्य करण्याविषयीं प्रथमतः प्रार्थना केली, तेव्हां शल्य क्रोधायमान होऊन त्यास जें ह्मणाला त्याचें वर्णन असें केलें आहेः—

### आर्या.

**शल्य सुयोधनवाक्यें कोपे चोळी करें करा डोळे**
**आरक्त करी चावे अधरांतें[1] फार तो मनीं पोळे. १.**
**मग कुरुजासि ह्मणे तो राया अवमानितोसि बाहूनी[2]**
**ह्मणसी सोडुनि धनु शर धरिं हयरश्मी[3] प्रतोद[4] बाहूंनीं[5]. २.**

---

१. ओंठास. २. बोलावून. ३. घोड्याचे लगाम. ४. चाबूक. ५ हातांनीं.

करिसी बहु प्रशंसा या नरवरमंडळांत कर्णाची
सांगसि सारथ्याची पदवी मजलागिं हीन वर्णाची. ३.
जो राजर्षिकुलोद्भव राजा मूर्धाभिषिक्त[1] या कामीं
योग्य कसा धर्मच्युत होतो पावेन केविं नाका[2] मी. ४.
सिंहासनोचिताला मज सारथ्याधिकार हा नीच
इच्छिसि नृपा कराया मत्तेजाची जनांत हानीच. ५.
युद्धीं दुर्बल मी हें गमलें तुज ह्मणवुनीच भूपा हें
सारथ्य योजिलें तरि दे दावुनि भाग शक्ति तूं पाहें. ६.
सांग मला भाग तया जिंकुनि जाईन आपुल्या देशा
अथवा एकचि मी रिपु-बळ मर्दिन दे मला रणादेशा[3]. ७.

मोरोपंत.

सिसरो ह्या प्राचीन तत्ववेत्त्यानें ह्मटलें आहे कीं, "वैभव आणि सद्गुण हींच काय तीं जगांत ग्राह्य आहेत—किंबहुना हीं संपादणें हेंच जिण्याचें सार्थक्य आहे—हें खरें तत्व लहानपणीं जर माझ्या मनांत ग्रंथादिकांवरून भरलें नसतें, तर, मीं इतकीं संकटें कधींही भोगिलीं नसतीं, आणि दुष्टांचीं तोंडें देखील पाहिलीं नसतीं. परंतु, ह्याविषयींच्या बोधानें ग्रंथ भरले आहेत; थोरांचीं वचनें भरलीं आहेत; आणि प्राचीन काळचे इतिहास उदाहरणांनीं भरले आहेत."

आतां, सत्कृत्यांतली सगळी महत्वाकांक्षा नेहमीं सफल होतेच असें नाहीं. तरी, सत्कृत्यांतली महत्वाकांक्षा धरणें हेंच एक मोठें भूषण आहे. थर्मापुली येथें सैन्यास जय मिळाला नाहीं; तें पतनच पावलें. तरी, त्याचें देव्हारें इतिहासांत गाजत आहे. नवीन जमीन शोधून काढण्याची महत्त्वाकांक्षा कोलंब-

१. मस्तकावर अभिषेक झालेला. २. स्वर्गास. ३. युद्धास आज्ञा.

सानें धरिली, त्यांत त्यास प्रथमतः फार क्लेश सोसावे लागले, आणि त्यानें शोधून काढलेल्या खंडास नांव शेवटीं दुसऱ्याच्याच नांवावरून पडलें; तरी, कोलंबसाच्या उद्योगाचें आणि साहसाचें पुराण लोक अद्याप भक्तिपूर्वक वाचीत आहेत. पानिपतच्या लढाईत अपयश आलें, तरी, गिलचांशीं सामना करण्यास भाऊसाहेब मोठ्या शौर्यानें गेले, ही त्यांची कीर्ति दुमदुमत आहे. सत्कार्याविषयींची महत्वाकांक्षा अवश्य धरावी, मग त्यांत यश येवो कीं न येवो. तें दैवावर आहे. लार्ड बेकन ह्यानें ह्मटलें आहे कीं, "मनुष्य दक्षतेनें लक्षपूर्वक वेळींच पाहील, तर त्याचें सुदैव त्याला खचीत दिसेल. सुदैव हें आंधळें आहे, पण तें अदृश्य नाहीं." खरें आहे.

शिकंदर बादशाहा आणि नेपोलियन बोनापार्ट हे तर महत्वाकांक्षेचे केवळ अवतार होते. शिकंदराला वाटे कीं, कोणत्याही बऱ्यावाईट कामांत—मद्यपानांत देखील—आपणावर कोणाची छाप राहूं नये—आपण सर्वांत श्रेष्ठ असावें, तशीच नेपोलियनाच्या महत्वाकांक्षेस मर्यादा नाहींशी झाली होती. आणखी कोणतीही गोष्ट अमर्याद झाली कीं तिचा परिणाम नाशकारक होतो. ह्मणून ह्या दोन्ही पराक्रमी पुरुषांस महत्वाकांक्षेपासून सुख झालें नाहीं; दुःख झालें.

आपल्या सगळ्या व्यवहारांत अधिकाधिक चांगलें होत जाण्याची हांव धरणें हें महत्वाकांक्षेचें चांगलें स्वरूप होय. महाराणीसरकारचे सध्याचे मुख्य प्रधान लार्ड रोजबरी—एवढ्या मोठ्या अधिकारावर आहेत तरी—दररोज चौदा चौदा सोळा सोळा तास काम करितात. ह्या कामांत आपण त्यांस मागें टाकूं असें मनांत आणून अठरा अठरा तास काम करण्याची

उमेद धरणें ही चांगली महत्वाकांक्षा होय. थोड्या पैशांत चांगला प्रपंच करणें हा गुण फार उपयोगी आहे. ह्यांत एकमेकांस मागें टाकण्याविषयीं एका मंडळीमध्यें प्रयत्न चालले असतात, असें माझ्या ऐकण्यांत आलें आहे. चांगलें आहे.

आपल्या पश्चात आपलें नांव रहावें, ही महत्वाकांक्षा फार चांगली आहे. पण नांव हें जसें सत्कृत्यावरून राहतें, तसें असत्कृत्यावरूनही राहतें. तुकाराम महाराजांचें नांव मागें राहिलें आहे, तसें आनंदीबाईचेंही राहिलें आहे. ह्यांत चांगलें कोणतें तें सर्वश्रुत आहे. चांगल्या कृत्यावरून नांव मागें राही असा प्रयत्न करावा. तें चांगलें कृत्य निरुपद्रव आणि सर्वांच्या उपयोगी असें पाहिजे. राजकारस्थानी पुरुष आणि सेनापति ह्यांचे शब्द त्यांच्या अमदानींत सगळे लोक झेलीत असतात. पण, त्यांच्या पश्चात् त्यांची आठवण इतिहासाबाहेर कोठें राहत नाहीं. तसें साधूंचें, कवींचें आणि ग्रंथकारांचें नाहीं. त्यांचीं नांवें अजरामर होतात. व्यास, वाल्मीकि, आरिस्टाटल, साक्रेटिस, तुकाराम, रामदास, गौतमबुद्ध, सिसरो इत्यादिकांचीं नांवें मागें राहिलीं आहेत; आणि तीं अशींच निरंतर राहावयाचीं आहेत. नेपोलियन बोनापार्टीचें नांव त्याच्या तुमुलयुद्धांनीं किंवा अपूर्व जयांनीं अजरामर झालेलें नाहीं; तर, त्यानें जें कायद्यांचें पुस्तक केलें आहे, त्यावरून अजरामर झालें आहे. असें कां होतें, ह्याचें कारण एवढेंच कीं, "जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति देह कष्टवीती उपकारें" हें बीज ह्यांच्या कृतींत आहे. शिकंदर, जेंगिझखान, नेपोलियन ह्यांनीं लोक जिंकिले नाहींत; तर, गौतमबुद्ध, शेक्सपियर, कालिदास, येशू ख्रिस्त ह्यांनीं लोक खरे जि-

किले आहेत. असें कां, तर, त्यांचें राज्य अद्याप चाललें आहे.
"जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला."

वर्डस्वर्थ ह्या नामांकित कवीनें असें ह्मटलें आहे कीं, "राजकारस्थानी मोठ्या माणसांचीं स्मारकें इतरांनीं करावीं, हें आवश्यक आहे. कां कीं, कालांतरें करून राष्ट्रास त्यांचा विसर पडण्याचा संभव असतो. परंतु, कवींसारख्यांचीं स्मारकें लोकांस करावयास नकोत. कां कीं, त्यांच्या कृति हींच त्यांचीं स्मारकें होत." खरें आहे. आणखी हीं स्मारकें अशीं आहेत कीं, तीं काळ लोटत जातो तसतशीं अधिकाधिक बळकट आणि प्रकाशमान होत जातात. कालिदास, शेक्सपियर, मोरोपंत, वामन इत्यादिकांचा मान दिवसेंदिवस वाढत चालला आहे. ह्मणजे, हीं माणसें दिवसानुदिवस अधिकाधिक लोकांस वंद्य होत चाललीं आहेत. आमच्यांतच पाहिलें तर, मोरोपंत, वामन हे कवि पंचवीस वर्षांपूर्वीपेक्षां सांप्रत काळीं अधिक लोकप्रसिद्ध आहेत. ह्मणजे त्यांचें राज्य वाढत चाललें आहे, असें ह्मणावयाचें.

महत्वाकांक्षा ही सर्व प्रकारच्या स्थितींत असते. शाळेंत विद्यार्थी एकमेकांशीं चढाओढ करीत असतात; व्यापारी आपापलें घोडें पुढें ढकलीत असतात; योद्धे एकमेकांशीं लढत असतात; ह्यांत महत्वाकांक्षा स्पष्ट असते. ह्या महत्वाकांक्षेनें मोठा आनंद होतो, आणि मोठें समाधान वाटतें. पण ती चांगल्या दिशेनें गेली तर मात्र तीपासून कीर्ति आणि लाभ हीं होतात. चित्रशाळेंतल्या मुलाप्रमाणें, दुसऱ्याच्या चित्रावर शाई टाकून, आपलें चित्र चांगलें ठरविण्याचा प्रयत्न करणें, ही महत्वाकांक्षा अत्यंत घातुक आहे. महत्वाकांक्षेनें कोणाच्या तरी सद्गुणाची

किंवा कल्याणाची वृद्धि झाली पाहिजे; कोणाचीही हानि होऊं नये; तीच महत्वाकांक्षा ग्राह्य होय.

गोएथ, ह्या नामांकित ग्रंथकारानें ह्मटलें आहे:–"मनुष्याचें जिणें उन्नतीनें सार्थकीं लागतें. त्याला जें काय करितां येतें, त्यानें त्याची सार्थकता होत नाहीं; तर त्याला करतां येण्यासारखें असतें, त्याच्या पूर्णतेनें त्याची सार्थकता होते."

मनुष्याची महत्वाकांक्षा ही त्याच्या राष्ट्राच्या महत्वाकांक्षेची एक लहानशी शाखा असावी. विद्या, ज्ञान, कला, धर्म, राजकारस्थान इत्यादिकांतला कोणताही विषय असो; त्यांत अशी महत्वाकांक्षा धरावी कीं, तिच्या योगानें एकंदर राष्ट्राच्या महत्वाकांक्षेच्या वृद्धीस भर पडावी. सर जान लबाक ह्यांनीं आपल्या ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, "आह्मां इंग्लिश लोकांस आमच्या देशबांधवांविषयीं गर्व वाहण्यास सबळ कारण आहे." असें ह्मणून त्यांनीं आपल्यांतल्या बेकन, हाब्स, लॉक, बर्कले, ह्यूम, न्यूटन, आडामस्मिथ, हर्शल, वाट, व्हीटस्टोन, सिंपसन आणि डार्विन ह्यांचीं नांवें मोठ्या डौलानें सांगितलीं आहेत. हीं सगळीं माणसें त्यांच्यांत शेंदीडशें वर्षांत होऊन गेलेलीं आहेत. ह्यांविषयीं ते असें ह्मणतात कीं, "ह्या पुरुषांनीं आमच्या राष्ट्राचा इतिहास सजविला आहे, आणि आमच्या विचारांस नांवारूपास आणिलें आहे." खरें आहे. हीच त्या राष्ट्राची महत्वाकांक्षा आहे. आणखी, अशीं नांवें सांगण्यास असावीं हें भूषण आहे. आह्मी एकदा डाक्टर मर्डक ह्या थोर गृहस्थांस भेटायास गेलों होतों. त्यांनीं मराठी भाषेविषयीं आह्मांस अनेक गोष्टी विचारिल्या, त्या आह्मीं यथाशक्ति सांगितल्या. त्यांत शेवटीं असें विचारिलें कीं, सध्या मराठींत इतिहासकार कोण आहेत,

कादंबरीकार कोण आहेत, नाटककार कोण आहेत, भूगोलशास्त्री कोण आहेत, खगोलशास्त्री कोण आहेत, पदार्थविज्ञानशास्त्री कोण आहेत, अर्थशास्त्री कोण आहेत, आणि भूदरशास्त्री कोण आहेत? ही प्रश्नांची वृष्टि आह्मीं निमूटपणीं साहिली. आमच्यानें एकाही प्रश्नाचें उत्तर देववलें नाहीं! कां कीं, ह्यांतली एकाही प्रकारची मंडळी आह्मांत सांगण्यासारखी नाहीं! एकाद्या माणसास एकादा अवयव नसावा, आणि त्याविषयीं त्याला जसा वारंवार फार संकोच वाटावा, तसा संकोच ह्या उणीवीचा आह्मांस वाटतो. परंतु, करावें काय? सध्याची आमची स्थिति तशीच आहे, तीस उपाय नाहीं.

कधीं कधीं असें घडतें कीं, अशीं माणसें जीवंत असतात तोंपर्यंत लोकांत त्यांजविषयीं फारसा लौकिक नसतो. परंतु, त्यांच्या पश्चात् त्यांचें माहात्म्य वाढत जातें. ह्याचें कारण असें आहे कीं, त्यांचीं मतें लोकांच्या मनांत भरायास वेळ लागतो. पण तीं एकदा भरलीं ह्मणजे, पाण्यास जसा बांध असतो, तशीं तीं मनुष्यांच्या अंतःकरणांस सांच्यासारखीं होतात. किंबहुना ते सगळ्या समंजस माणसांचे वाटाड्ये होतात, त्यांचीं मतें लोकांस मान्य होतात, आणि त्यांच्या अनुरोधानें ते वर्तूं लागतात.

ही महत्वाकांक्षा माणसांस सगळ्या चांगल्या व्यवसायांत असावी. नामदार ग्ल्याडस्टन ह्यांच्याविषयीं अशी एक आख्यायिका आहे कीं, आजपर्यंत त्यांच्या वेळीं झालेल्या सगळ्या प्रकारच्या मोठमोठ्या शास्त्रज्ञांशीं, त्यांच्या त्यांच्या विषयांत ते झगडले आहेत, आणि त्यांत त्यांस हार गेले नाहींत. इतर विषयांची गोष्ट तर असो. परंतु, धर्मासारख्या गहन विषयांत त्यांनीं त्यांच्यांतल्या मोठमोठ्या धर्मप्रचारकांशीं वाद करून जय मिळ-

विले आहेत. आमच्यांतले कैलासवासी महादेव मोरेश्वर कुंटे हेही अशाच वृत्तीचे होते. अमका विषय तुह्मांस येत नाहीं, असें कोणीं त्यांस ह्मटलें कीं त्यांचें पित्त खवळत असे. पुणें शहराच्या आरोग्याच्या संबंधानें ते वैद्यखात्याच्या मुख्यांशीं वाद घालीत असत. मोठा भगीरथ प्रयत्न करून ते पाठशाळेंत संस्कृताचे अध्यापक झाले होते. ह्याला ह्मणावें महत्वाकांक्षा. अशी महत्वाकांक्षा सर्वांस धरितां यावयाची नाहीं, हें खचीत आहे; कां कीं त्यास तशी विलक्षण बुद्धि लागते. परंतु, निदान कांहीं विषयांत—एका कोणत्या तरी विषयांत अशी महत्वाकांक्षा धरणें आणि त्या दिशेनें प्रयत्न करणें हें कांहीं दुष्कर किंवा असाध्य नाहीं. तो प्रयत्न सर्वांनीं यथाशक्ति करावा.

शिवाय, कितीएक विषय असे आहेत कीं, त्यांत महत्वाकांक्षा प्रत्येक माणसास धरितां येईल, आणि ती सिद्धीस जाईल. ह्या महत्वाकांक्षेस आह्मी अभिमान ह्मणतों, ह्मणजे हें प्रकरण लवकर लक्षांत येईल. मनुष्य कोणत्याही स्थितींत असो, त्याला असा अभिमान धरितां येईल कीं, आपणास सर्वांनीं सत्यवक्ता ह्मणावें; आपणास असत्याचा दोष कधीं लागूं नये; अथवा, आपण निरंतर सत्कर्म करावयाचें, असत्कर्म कधीं करावयाचें नाहीं; असा अभिमान कोणालाही धरितां येईल. अथवा, आपल्या मनास जें काय खरोखर चांगलेंसें वाटतें, तें करावयाचें, त्याविषयीं कोणाची परवा करावयाची नाहीं, असा अभिमान सिद्धीस नेतां येईल. अथवा, इतर प्रकारीं आपलें कांहींही होवो, आपण स्वदेशहित करावयाचें, दुसरें कांहीं करावयाचें नाहीं, हा अभिमान सिद्धीस जाईल. ह्यांत क्लेश अतिशयित सोसावे लागतील, हें उघड आहे; अत्यंत क्लेश सो-

सावे लागतील; परंतु, अभिमान निभेल; त्याला व्यत्यय याव-याचा नाहीं. अशा प्रकारचे अभिमान पुष्कळांचे निभले आ-हेत. त्यांत, सामाजिक किंवा धर्मसंबंधी सुधारणा करण्याची इच्छा ज्यांच्या ठायीं अवतरली होती, अशा माणसांचा ह्या प्रकारचा अभिमान उत्तम प्रकारें निभला, असें इतिहासावरून स्पष्ट दिसत आहे. लूथर, जान नाक्स इत्यादि उदाहरणें युरो-पाच्या इतिहासांत आहेत, आणि विष्णु परशराम रानडे, विष्णु परशराम पंडित इत्यादि उदाहरणें आमच्या देशाच्या अर्वा-चीन इतिहासांत आहेत.

अशा प्रकारें मनुष्याच्या आचरणांत महत्वाकांक्षेस पाहिजे तितकी जागा आहे. ती मनांत आणण्याचा निश्चय मात्र त्यानें केला पाहिजे. आणखी आह्मांला तर असें वाटतें कीं, अशा प्रका-रचा कोणताही अभिमान ज्याला नाहीं, तो मनुष्य नाहीं. अशा प्रकारच्या अभिमानाच्या भरीं भरून कलहास किंवा दुसऱ्याच्या उपमर्दास प्रवृत्त होऊं नये. परंतु, निरंतर शांतपणा धरून आपला अभिमान तडीस न्यावा, हा पुरुषार्थ आहे. आपणास कोणीं वाईट ह्मणूं नये, आपल्या योगानें आपल्या कुलास हीनता येऊं नये, आपल्यामुळें राष्ट्राच्या लौकिकास बट्टा लागूं नये, तर, आपणा स्वतःस, आपल्या कुलास आणि आपल्या राष्ट्रास थोडाबहुत लौकिकच प्राप्त होईल, अशा प्रकारें वागणें हें कधीं सोडावयाचें नाहीं, असा अभिमान प्रत्येक माणसानें दृढ नि-श्चयानें धरावा. त्याच्या योगानें त्याचें इहलोकीं आणि पर-लोकीं असें दोहींकडे कल्याण होतें.

## १८.

# उद्योग.



प्रपंच चालविण्यास काम करावें लागणें—उद्योग करावा लागणें—हें एक मोठें संकट आहे, मोठी पीडा आहे, असें पुष्कळांस वाटतें. परंतु, तें अगदीं खोटें आहे. उद्योग हें संकट नाहीं, तर उद्योग हें उलटें सुख आहे.

"भुकेला कोंडा आणि झोंपेला धोंडा" अशी ह्मण आहे. तिचा आशय एवढाच आहे कीं, गोडी पदार्थाचे ठायीं नसते, तर, त्या पदार्थाची जी वाण आपले ठायीं उत्पन्न होते, तींत असते.

आधीं प्रथम, कालक्षेप करणें हें एक फार मोठें कृत्य मनुष्यास करावयाचें असतें. राजा असो कीं रंक असो, "आतां काय करूं, आतां हा वेळ कसा घालवूं" असें वाटणें ह्यासारखें दुसरें संकट नाहीं. ह्याचा अनुभव सर्वांस आहे. ह्या अडचणीच्या निवारणास उत्तम आणि रामबाण असा उपाय ह्मटला ह्मणजे उद्योग होय. उद्योग नसला ह्मणजे माणसास, "आतां काय करूं" असें कोडें पडतें, आणि उद्योग असला ह्मणजे वेळ कसा निघून जातो, हें त्याला कळतही नाहीं.

शिवाय, उद्योगाच्या योगानें प्रपंचांतल्या काळजीचा विसर पडतो. आणि काळजीचा विसर पडणें हें एका प्रकारचें सुख आहे. किंबहुना डोक्यावरचें ओझें उतरण्यासारखें आहे. तहान लागली ह्मणजे प्राणी सहज पाण्याकडे धांवतात. त्याप्रमाणें कोणत्याही प्रकारचें दुःख झालें, ह्मणजे माणसें परमेश्वरभक्तीकडे धांव घेतात. आणि परमेश्वरभक्ति हें काय आहे? मन

गुंतविणें आहे; आणि मन परमेश्वरभक्तींत गुंतलें कीं तें दुःखां-तून मोकळें होतें, हें उघड आहे. मनुष्य देवालयांत गेला ह्मणजे घरांत नाहींसा झाला, हें उघड आहे.

उद्योगाचे अनेक प्रकार आहेत; आणि त्यांच्या योगानें मनुष्यास वेगळ्या वेगळ्या प्रकारें सुख होतें. एक चांगला ग्रंथकार ह्मणतो कीं, शेतांत काम करणें हा उद्योग सर्वांत उत्तम आहे; त्याच्या योगानें आधीं प्रथम हवा उत्तम मिळते; आंगाला व्यायाम उत्तम प्रकारचा होतो; मन आणि शरीर हीं दोन्ही कामांत गढून जातात; आणि तो उद्योग असा पवित्र आहे कीं, त्यांत पाप असें कांहींएक नाहीं; मेहेनत करून आईजवळ खायाला मागावयाचें, आणि आई देईल तें खायाचें. खरें आहे. ह्याशिवाय, ह्या उद्योगांत नानाप्रकारची वनशोभा पाहून नेत्रांस आनंद वाटतो; नानाप्रकारचे पुष्पसुगंध येऊन घ्राणास हर्ष होतो; पशुपक्ष्यांची किलबिल कानीं पडून, हें काय बोलणें चालतें आहे, असें वाटून चमत्कार वाटतो; आणि त्यांतल्या त्यांत, वनस्पतींच्या उत्पत्तीचे, वृद्धीचे, आणि लयाचे चमत्कार पाहायास सांपडतात ते वेगळेच.

प्राचीन साधूंनीं असें ह्मटलें आहे कीं, उद्योग ही सुखाची किंमत आहे, तें अगदीं खरें आहे. उद्योगावांचून सुख नाहीं. मग तो उद्योग कोणी करो, आणि सुख कोणालाही होवो. भिक्षेकऱ्याला मूठभर तांदूळ मिळतात, त्यानें त्याला सुख होतें. पण तें सुख त्याच्या श्रमांचें नसतें; तर, ते तांदूळ ज्यानें उत्पन्न केलेले असतात, त्याच्या श्रमांचें असतें. आणखी सृष्टीमध्यें असा कांहीं चमत्कार दृष्टीस पडतो कीं, एकाचे श्रम, कोणाचीही हानि न होतां, दुसऱ्यांच्या उपयोगीं पडतात. राबर्ट

ब्रूस ह्यानें, त्या कोळ्यास आपलें घर बांधण्याची खटपट सहा-वेळ पुनः पुनः करितांना पाहिलें; आणि सातव्यानें, त्याला यश आल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. तेवढ्यावरून त्याला बोध मिळून, त्याला देशहिताच्या कामीं उद्योग करण्याची मोठी उमेद आली. आणि तिच्या योगानें त्या महत्कार्यांत त्याचे मनोरथ सिद्धीस गेले. ह्मणजे कोळ्याच्या उद्योगानें कोळ्याचें कार्य साधलें, आणि त्याची कांहींएक हानि न होतां, ब्रूस ह्याचेंही कार्य साधलें. ही गोष्ट चांगल्या ग्रंथकारांस फार स्थूल मानानें लागू आहे.

तत्ववेत्त्याचा एक सिद्धांत असा आहे कीं, जें काय दृश्यमान ह्मणून आहे, त्याचा नाश केव्हांतरी खचीत व्हावयाचा आहे. लोखंडाचा नाश दोन प्रकारांनीं होतो; जंगून आणि झिजून. त्यांत, जंगून नाश होण्यापेक्षां झिजून नाश व्हावा, हें चांगलें आहे. झाडावर सुंदर सुवासिक फूल आलें आहे, तें झाडाच्या झाडावर कोमेजून वाळून जाण्यापेक्षां तें हारतुऱ्यांत बसावें, आणि माणसांच्या आंगावर शोभून मग वाळावें, हें चांगलें आहे. ह्याचप्रमाणें मनुष्याच्या देहाचें आणि बुद्धीचें समजावें. देह आणि बुद्धि हीं, कांहींएक उद्योग न करितां, जागचेजागीं खुडकून राहून नाहींतशीं व्हावीं, त्यापेक्षां, तीं सत्कार्यीं झिजून नाहींतशीं व्हावीं, हें योग्य आहे. बापू गोखले ह्यांचें शरीर सार्थकीं लागलें आहे, त्याप्रमाणें कालिदासमोरोपंतादिकांची बुद्धि सार्थकीं लागली आहे. ह्या गोष्टी कोणीही समंजस माणूस नाकबूल करणार नाहीं.

आणखी सध्याचा काळ प्राचीनकाळापेक्षां उद्योगाला फारच चांगला आहे. आधीं प्रथम उद्योगाला मार्ग पुष्कळ झाले

आहेत. आपण आज पाहिजे तो उद्योग हातीं घ्यावा; त्यास जें काय साहित्य पाहिजे आहे, तें थोडक्यांत तयार आहे. त्याप्रमाणेंच, आपल्या श्रमांचें फळ फुकट जाण्याची भीति तिळभरही नाहीं. पेंढार येऊन आपलें शेत कापून नेईल किंवा आपलें घर लुटून नेईल, अशी भीति काडीमात्र राहिली नाहीं. अशा प्रकारची स्थिति आपल्या राष्ट्रास आली आहे, ही परमेश्वराची मोठी कृपा होय.

जन्मभर उद्योग, उद्योग, उद्योग करून करावयाचें काय? विश्रांति मुळींच नको काय? विश्रांतीवांचून सुख कसें व्हावें? अशी शंका कोणी काढितात. तिचें समाधान असें आहे कीं, विश्रांति ह्याचा अर्थ थोडा बदलावा ह्मणजे झालें. विश्रांति ह्मणजे कामाचा पालट. अगदीं स्वस्थ—अगदीं कांहींएक न करितां—बसणें हें मनुष्याच्या सामान्य वृत्तीस अगदीं वावडें आहे, तें तिला रुचत नाहीं. कांहीं तरी उद्योग चालत असावा, ह्यांत त्या वृत्तीला स्वभावतःच सुख वाटतें. ह्मणून एका प्रकारच्या उद्योगाचा कंटाळा आला, ह्मणजे दुसऱ्या प्रकारचा उद्योग करूं लागावें, ह्मणजे तीच विश्रांति वाटते. शेतांत पुष्कळ काम करून शीण आला ह्मणजे, तो जाण्यास स्वस्थ बसून एकादा उत्तम ग्रंथ वाचणें, ह्यासारखें दुसरें उत्तम साधन नाहीं. अथवा, दरबारांत न्यायासारखीं मोठीं कामें करून जीव त्रासला ह्मणजे, त्यास विश्रांति प्राप्त होण्यास, फुलझाडें लावणें, झाडांचीं कलमें करणें, बागेची व्यवस्था नीट लावणें, कुंड्या कांहीं वेगळ्या पद्धतीनें मांडणें, इत्यादि कामें फार उपयोगीं पडतात. ह्याचा अनुभव आला आहे. लिहितांना जीव थकला ह्मणजे वाचण्यांत विश्रांति मिळते; वाचण्यांत थकला

ह्मणजे लिहिण्यांत मिळते; अशा पालटानें, उद्योग कायम राहून विश्रांति प्राप्त होते, असें पुष्कळ थोर पुरुषांच्या अनुभवास आलें आहे. महाराणी सरकारची मुख्य प्रधानकी चार वेळां करून ज्यांनीं आपलें नांव इंग्लंडांत गाजविलें आहे, त्या ग्लाड्स्टन साहेबांस लांकडें फोडण्याची मोठी हौस आहे. त्यांच्या कुऱ्हाडींचीं चित्रें एका वर्तमानपत्रांत देऊन, त्यांचा गौरव नुकताच केलेला आहे. ते आतां अगदीं वृद्ध–सत्यायशीं वर्षांचे असून, आणि नानाप्रकारचीं अनेक कामें करून थकले आहेत. तरी, प्राचीन कवींच्या काव्यांचीं भाषांतरें इंग्रजींत करण्याचा उद्योग–आपण सांगून आणि दुसऱ्या माणसांकडून लिहिवून–चाललाच आहे. ह्याचा अर्थ एवढाच कीं, त्यांस उद्योगांत विश्रांति सांपडते.

मनुष्य कोठेंही असो, त्याची स्थिति कांहींही असो, त्यानें आपलें काम आपण स्वतः करावें. त्याविषयीं दुसऱ्याच्या भरंवशावर कधीं राहूं नये. कां कीं, कोणी झाला तरी त्याला स्वतःचें ह्मणून कांहीं ना कांहीं तरी काम असतेंच. आपलें काम एकीकडे ठेवून दुसऱ्याचें काम हातीं घेणारीं माणसें फार विरळा असतात. ह्मणून आपलें काम आपण जातीनें केलें पाहिजे. लावीपक्षीण आणि तिचीं पिलें ह्यांची गोष्ट सर्वांस ठाऊक आहेच. आधीं आपण कंबर बांधावी, आणि मग पाहिजे असल्यास दुसऱ्यांस साह्यास बोलवावें. कामावर "या" ह्मणावें, "जा" ह्मणूं नये.

चांगल्या मनःपूर्वक केलेल्या श्रमांचें फल मनुष्यास मिळावें–मिळालेंच पाहिजे–अशी सृष्टीची रचना परमेश्वरानें मनुष्याच्या सुखार्थ करून ठेविली आहे. मात्र ते उद्योग एकनिष्ठेनें झा-

लेले असले पाहिजेत. ह्मणजे सृष्टि ही माणसास जणुंकाय असें ह्मणते कीं "बाबा माणसा, उद्योग कर, उद्योग कर; प्रत्येक पळ उद्योगांत घालीव; मग त्यापासून तुला तात्कालिक लाभ होवो कीं न होवो. उद्योग करीत रहा, त्यांत अंतर पडूं देऊं नको, ह्मणजे त्याबद्दलचें बक्षीस तुझ्या पाठीमागें लागत आपोआप येईल; तें नको ह्मणून देखील तुला चुकवितां यावयाचें नाहीं. श्रम करावयाचे ते शेत नांगरण्यासारख्या अडाणीपणाच्या कामांत कर, किंवा एकादें उत्तम काव्य लिहिण्याच्या नाजूक कामांत कर; ते श्रम, प्रामाणिकपणानें आणि जिवाच्या कळकळीनें कर; ह्मणजे त्यांच्या योगानें तुझ्या चित्ताला समाधान वाटेल. तेंच मोठें बक्षीस आहे. सत्कार्यांतल्या श्रमास कितीही वेळां अपयश आलें तरी चिंता नाहीं; पण तें सोडूं नको. सत्कार्यांत मनुष्यास जय यावयाचाच यावयाचा. सत्कार्य सिद्धीस जाणें हेंच एक प्रत्यक्ष फार मोठें बक्षीस आहे." खरें आहे.

सांप्रत काळीं आमच्या लोकांस ज्ञानसंग्रह करून घेण्याचा उत्तम हंगाम प्राप्त झाला आहे—नवस करून कधीं मिळावयाचा नाहीं असा वेळ मिळाला आहे—असें मी समजतों. राज्यकर्त्यांच्या कृपाप्रसादानें इंग्लिश भाषेचा प्रसार आपल्या देशांत होऊं लागला आहे, आणि इंग्लिश भाषा ही आजकाल केवळ ज्ञानदृष्टि किंवा दिव्य दृष्टि आहे. हिच्या द्वारें सगळें ब्रह्मांड दिसतें. इतर गोष्टी क्षणभर एकीकडे असोत. जर कोणाला अशी इच्छा झाली कीं, पृथ्वीच्या पाठीवर हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, बौद्ध, यहुदी, चिनी, इत्यादि अनेक राष्ट्रांचे अनेक धर्म आहेत, त्यांचें ज्ञान करून घ्यावें, तर, त्यानें इंग्लिश भाषा शिकावी, ह्मणजे त्याचे हेतु सहज सफल होतील. कां कीं, ह्या

सगळ्या धर्मांच्या शास्त्रांचीं भाषांतरें इंग्रजी भाषेंत तयार आहेत. ह्याच प्रकार अनेक राष्ट्रांच्या वर्णनांविषयीं, इतिहासांविषयीं, शास्त्रांविषयीं, रीतिभातींविषयीं, व्यापाराविषयीं, कलाकौशल्याविषयीं आणि इतर सर्व गोष्टींविषयीं आहे. ह्मणजे, इंग्रजी भाषेचें ज्ञान करून घेतलें कीं सगळी पृथ्वी माणसापुढें उभी राहाते. एवढें जिचें सामर्थ्य आहे, ती भाषा आपणास सुसाध्य झाली आहे. तिच्या द्वारें आपली उन्नति करून घेण्यास आपण कायावाचामनेंकरून झटावें.

पृथ्वी जिंकल्यावर आकाशांतले गोल जिंकण्यास ज्याला फार इच्छा होती, त्या शिकंदर बादशाहासारख्या माणसास इष्ट कार्यें साधण्यास आयुष्य थोडें वाटेल तर वाटो. परंतु, सद्गुणांचें संपादन, सदाचरण, ज्ञानग्रहण, परोपकार, परमेश्वरभक्ति इत्यादि ज्या गुणांच्या योगानें मनुष्यास सज्जनता प्राप्त होते, ते गुण संपादण्यास पुरे असें आयुष्य माणसांस देवानें दिलेलें असतें. जे लार्ड बेकनासारखे महाज्ञानी झाले, किंवा साक्रेटिसासारखे महानीतिमान झाले, किंवा समर्थांसारखे परम धार्मिक झाले, त्यांस आयुष्य फार होतें असें नाहीं. त्यांनीं आपल्या आयुष्याचा उपयोग चांगला केला, वेळ व्यर्थ घालविला नाहीं, ह्याच्या योगानें त्यांस महापद संपादितां आलें. ह्मणजे सांगावयाचें तात्पर्य असें आहे कीं, वेळ नाहीं, ही जी कितीएकांची कुरकूर वारंवार ऐकूं येते, ती अगदीं खोटी आहे. वेळ पुष्कळ असतो. आणखी इच्छा असली ह्मणजे उपाय सुचतो.

सर जान लबाक ह्यांनीं आपल्या ग्रंथांत एका ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, "आह्मां इंग्लिश लोकांस जें काय यश प्राप्त झालें आहे, त्यास मूळ आधार उद्योगाचा आहे. केवळ आह्मी

स्वतः उद्योग करीत आहोंत एवढेंच नाहीं; तर पंचमहाभूतांस आह्मीं उद्योग करायास लाविलें आहे." खरें आहे. सूर्यास चित्रें काढायास लाविलें आहे, आणि विजेस दिवे लावायास आणि बातमी पोंचवायास लाविलें आहे. आणखी वाफेस कोणकोणतीं कामें करायास लाविलें आहे, ह्याची तर गणतीच नाहीं. एमर्सन ह्या ग्रंथकारानें तर एकेठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, "वाफ हा एक इंग्रज आहे."

ग्लासगो विश्वविद्यालयांतल्या विद्यार्थ्यांस बोध करीत असतां लार्ड स्टान्ले हे ह्मणाले, "मनुष्य केवढाही असो, आणि त्याच्या ठायीं दुसरे कितीही गुण असोत, तो उद्योगी नाहीं, तो जर आळसांत वेळ घालवितो, तर तो कधींही खरा सुखी व्हावयाचा नाहीं. उद्योग हा आपला जीव आहे. तुह्मांस काय करतां येतें तें मला दाखवा, ह्मणजे तुमची योग्यता काय आहे तें मी सांगेन. चांगल्या उद्योगाच्या संवयीनें किंवा आवडीनें मनुष्य नीच वृत्तीपासून पराङ्मुख होतो—त्यास दुष्टपण सुचत नाहीं—एवढेंच केवळ नव्हे, तर, आत्मस्वार्थापासून ज्या विवंचना आणि जे त्रास उत्पन्न होतात, त्यांचें निराकरण करण्यास—किंवा कदाचित् त्यांस मुळीं उत्पन्नच न होऊं देण्यास—हें उत्तम औषध आहे." हें शब्दशः खरें आहे. मनुष्याला मन एक. तें जर सत्कर्मांत नेहमीं गुंतलेलें असलें, तर, असत्कर्माकडे वळण्यास त्याला अवकाश होऊं नये हें साहजिक आहे.

आह्मांला असें वाटतें कीं, पृथ्वीवरचीं सगळीं माणसें जर आपल्या शक्त्यनुसार चांगले उद्योग करतील, तर दुनयेंत दुर्भिक्ष असें मुळींच कोठें दृष्टीस पडणार नाहीं. एक चिनी बादशाहा

ह्मणत असे कीं, "जर कोणी एकादें माणूस कांहींएक उद्योग करीत नाहीं, तर, त्याच्या निर्वाहाकरितां, जगांत दुसऱ्या कोणी तरी माणसानें उद्योग केला पाहिजे." हें ह्मणणें खरें दिसतें. भिक्षेकऱ्यांचें ओझें उद्योगी माणसांस वाहावें लागत आहे.

सौदी ह्मणून एक मोठा इंग्लिश ग्रंथकार होऊन गेला. तो मोठा उद्योगी असे. त्याला उद्योगाची किंमत लहानपणापासून कळत असे. उद्योग हा त्याचा जीव होता. त्यानें आपल्या वयाच्या एकुणिसाव्या वर्षीं लिहिलें कीं, "एकुणीस वर्षें! ह्मणजे माझ्या उमरीचा सरासरी चौथा हिसा! हा कांहीं लहान नव्हे; बराच मोठा आहे. पण मी माझ्या समाजास एक तिळभर देखील उपयोगी पडलों नाहीं. शेतांतलीं पांखरें हांकणारा माणूस असतो, तो धान्याचें रक्षण करितो. तें धान्य मी खातों. पण मी कांहींच करीत नाहीं." असे विचार मनांत येणें हें तरी एक मोठें सुदैव आहे. असे विचार मनांत आल्यावर माणसास थोडाना थोडा तरी उद्योग करण्याची इच्छा होईलच होईल.

उद्योग हा परिस आहे, असें कोणी ह्मटलें आहे. पण मी ह्मणतों कीं, उद्योगाचे ठायीं परिसापेक्षांही गुण अधिक आहेत. परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें, एवढेंच काय तें, पण उद्योगाच्यायोगानें सगळ्या पदार्थांचें सोनें होतें, हातांत धरावें त्याचें सोनें होतें. एवढेंच केवळ नव्हे; तर, परिसानें किंवा सोन्यानें जें कार्य व्हावयाचें नाहीं, तें उद्योगानें होतें. तें कोणतें, तर मनुष्याचें खरें हित. ह्मणजे असत्कर्मापासून निवृत्ति आणि समाधान, हीं प्राप्त होतात. शिवाय, अंतःकरणास एक प्रकारचें सुशिक्षण मिळतें, तें सगळ्या कार्यांत उपयोगी पडतें.

लहानपणीं असा उद्योग करावा कीं, तेणेंकरून तरुणपण

सुखाचें जावें; तरुणपणीं असा उद्योग करावा कीं, तेणेंकरून वृद्धापकाळ सुखाचा जावा; आणि वृद्धापकाळीं असा उद्योग करावा कीं, मरण स्वस्थपणें यावें.

सर वाल्टर स्काट नेहमीं ह्मणत असे कीं, "कांहीं तरी उद्योग केल्यावांचून कधींही राहूं नये."

इतिहासकार राबर्टसन ह्मणत असे कीं, "कांहींएक उद्योग न करितां राहणें हें मरणें आहे."

फ्रेंच तत्ववेत्ता व्हालटेर ह्याच्या तोंडांत नेहमीं असे कीं, "सतत उद्योग करावा."

समर्थांनीं ह्मटलें आहे "ऐका सुदैवपणाचें लक्षण, रिकामा जाऊं नेदी क्षण."



## १९.

## वेळाचें मोल.



पदार्थास किंमत पडण्यास त्याचे ठायीं जे गुण आवश्यक आहेत ह्मणून अर्थशास्त्रवेत्त्यांनीं स्थापित केलें आहे, त्यांत मुख्य गुण हा आहे कीं, पदार्थ देतां घेतां आला पाहिजे. देतां घेतां येत नाहीं अशी वस्तु कितीही उपयोगी असली, आणि लोकांस ती मिळविण्याची कितीही इच्छा असली, तरी तीस किंमत कधीं यावयाची नाहीं. ह्मणजे ती बिनमोल आहे ह्मणावयाची. अशी एक वस्तु वेळ होय. ह्या लोकीं जगण्याचा प्राण्याचा जो नियमित वेळ असतो, त्यास आयुष्य अशी संज्ञा आहे. आणि एका कवीनें ह्मटलें आहे कीं, "कोट्यावधि रुपये खरचिले तरी आयुष्याचा एक क्षणदेखील मिळायाचा नाहीं." ह्मणजे ह्याचा आशय असा आहे कीं, आयुष्यही वस्तु विकत मिळण्यासारखी नाहीं.

ह्मणजे आयुष्य हें फार मोलवान आहे; अत्यंत दुर्मिळ आहे; तें इतर सर्व वस्तूंपेक्षां माहाग आहे, आणि इतर सगळ्या वस्तूंपेक्षां अधिक उपयोगी आहे. कनककांतादि सर्व प्रकारचें वैभव माणसास प्राप्त आहे, आणि एक आयुष्य नाहीं, तर त्या वैभवाचा त्याला काय उपयोग? आयुष्य आहे तर इतर वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करण्यास जागा आहे; आणि तें नाहीं, ह्मणजे कांहीं नाहीं; आयुष्य नाहीं ह्मणजे सगळें शून्य! एवढी आयुष्याची योग्यता आहे. ह्यास माणसानें फार जपायास पाहिजे.

आतां आयुष्यास जपायाचें ह्मणजे काय? तें द्रव्यासारखें

सांठवून ठेवितां येत नाहीं, एकाद्या प्राण्याप्रमाणें धरून ठेवितां येत नाहीं. तरुण असो वृद्ध असो, श्रीमंत असो गरीब असो, शाहाणा असो वेडा असो, प्राण्याचें आयुष्य एकसारखें सरत असतें. त्याच्या गतीला कधीं खंड पडत नाहीं. दुःखानें रडा किंवा आनंदानें हंसा, जागे असा किंवा झोंपीं जा, उद्योग करीत असा किंवा स्वस्थ हातपाय जोडून बसा, आयुष्य पळपळ चाललें असतें. त्याची गति कधींच कुंठित होत नाहीं. एक घटका जाते तिचे जागीं दुसरी येते, दुसरी जाते तों लागलीच तिचे जागीं तिसरी येते, मध्यें खंड पडत नाहीं. ह्यामुळें त्या घटकांची किंमत वाटत नाहीं. जणुकाय घटका जातच नाहींत, आयुष्य स्थिर आहे, अशी भावना होते. ही एक फार मोठी भूल आहे. "गेली आजची घडि नये उद्यां" हें खरें आहे. मध्यें खंड पडत नाहीं खरा; पण, गेली घडी पुन्हा येत नाहीं, गेली ती वेगळी, सध्यां जात आहे ती वेगळी, आणि पुढें येणार आहे ती वेगळी, असा प्रकार आहे. अशा ह्या अखंड प्रवाही तत्वास जपायाचें ह्मटलें ह्मणजे त्याचा कांहीं तरी चांगला उपयोग करणें हेंच आहे.

डाक्टर जान्सन ह्यानें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, "आयुष्य जपून खरचिलें, तर सगळ्या कामांस पुरतें." हें खरें आहे. "वेळ नाहीं," ही तक्रार आळशी माणसांची असते. आणखी जे लोक वेळ नाहीं ह्मणून ओरडत असतात, त्यांस वेळ नसतो असें नाहीं, वेळ पाहिजे तितका पुष्कळ असतो, पण त्यांस काम करण्याची इच्छा नसते, एवढेंच कायतें.

एक एक क्षण आळसांत जात आहे, तो हातचा एक मोठा ठेवा जात आहे, असें समजावें; आणि जो एक एक क्षण सत्का-

यांत खरचत आहे, तो सगळा भारी दरानें व्याजीं लावलेला अपरिमित पैसा आहे, असें समजावें.

आधीं कलियुगांत आयुष्याची मर्यादा शंभर वर्षांची; त्यांतलीं सरासरीनें पन्नास हातीं लागतात. त्यांतलीं दहापंधरा बालपणांत जातात; कितीएक काळजींत जातात; कितीएक आजारांत जातात; कितीएक प्रपंचाच्या कामीं लागतात; कितीएक लोकांचें मन धरण्यांत जातात; कितीएक बोलतांचालतां निघून जातात; कितीएक आपल्या आप्तांविषयींची आणि आपल्या मुलांविषयीं काळजी वाहण्यांत जात; असें होतां होतां, खरें पाहिलें असतां मनुष्याच्या स्वाधीन असा वेळ फार थोडा—अतिशयित थोडा—राहातो; तरी, तासांचे तास आणि प्रहरांचे प्रहर नुसत्या गप्पांत घालविण्यास माणसास जीवावर कसें येत नाहीं, ह्याचें मोठें नवल वाटतें! लार्ड चेस्टरफील्ड ह्यानें आपल्या मुलास लिहिलें, "बाबारे, वेळाचें खरें मोल बरोबर समज, तो हातीं आला कीं पकड, आणि त्याचा—प्रत्येक क्षणाचा—चांगला उपभोग घे. बावरूं नको." फास्ट ह्या कवीनें ह्मटलें आहे कीं, "जर तूं खरोखर उत्सुक झाला आहेस, तर सध्यां चाललेला आहे, हाच क्षण धर, आणि आतां ह्या क्षणीं, तुला करतां येतें तें किंवा करतां येण्यासारखें वाटत असेल तें करण्यास एकदम आरंभ कर; वेळ गमवूं नको." खरें आहे. ही घडी पुनः यावयाची नाहीं.

वेळ हातीं आल्यावर त्याचा चांगला उपयोग व्हावयाचा असला, तर तो वेळ हातीं यावा; हें चांगलें आहे. पण तोच जर त्याचा असद्व्यय होणार असेल,—हातून दुष्कर्मे होणार असतील—तर तो वेळ हातीं न आलेला बरा. "कुसंतानापेक्षां

निसंतान बरें." दुर्जन आधीं काळाचे हाल करितात, आणि मग काळ त्यांचे हाल करितो. सोडीत नाहीं.

दुखणें हें कोणाच्या हातचें नाहीं. त्याविषयीं कोणास नांव ठेवितां येत नाहीं. परंतु, आळशी होणें ह्यास कांहीं सबब नाहीं. आळशी होणें हा मोठा दोष आहे. वेळ व्यर्थ घालविणें हा आळस आहे, ही गोष्ट सगळे लोक कबूल करितात. तरी, तो अपराध करायास ते चुकत नाहींत.

हातून एकसारखा उद्योग होत नाहीं, वेळ पुष्कळ फुकट जातो, ह्याचें मूळ बीज असें आहे कीं, आपलें आयुष्य अत्यंत मर्यादित आणि क्षणभंगुर आहे, हा विचार पुरतेपणीं मनांत ठसलेला नसतो. आणि जेव्हां कालमर्यादा साधावी लागते, तेव्हां सगळीं कार्यें, हरतऱ्हा करून—मग सावकाश ह्मणा किंवा लवकर लवकर ह्मणा, कशीं तरी करतात; राहूं देत नाहींत. ह्याचें मोठें उदाहरण लग्नमुहूर्ताचें आहे. टाळी वाजण्याच्या आधीं, सामाजिक प्रघातानुरूप आणि धर्माज्ञानुरूप कितीएक कृत्यें व्हावयाचीं असतात. आणि कधीं कधीं त्यांस वेळ अगदीं थोडा असतो. तरी तीं कशीं तरी उरकून घेतात.

**तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी**
**प्राप्त काळघडी आल्याविण.**

ह्याचा अर्थ हाच आहे. हाच विचार आपल्या सगळ्या आयुष्याविषयीं मनांत ठेविला, आणि त्यांत तें अत्यंत क्षणभंगुर आहे, हें नेहमीं ध्यानांत ठेविलें, ह्मणजे, जन्मामध्यें जीं काय कामें करावयाचीं असतात, तीं करायास वेळ सहज पुरतो. आतां होण्यासारखें काम मगवर टाकूं नये, ही मुख्य गोष्ट आहे.

कोणतेंही कार्य करण्यास साहित्य लागतें. त्या साहित्यामध्यें वेळ ही एक वस्तु आहे. ती सगळ्यांत मुख्य आहे. इतर सगळें साहित्य आहे, आणि जर वेळ नाहीं, तर तें सगळें साहित्य फुकट जातें. डाळतांदूळ, पीठमीठ इत्यादि सगळें साहित्य तयार केलें, पण स्वैंपाक करायास जर अवकाश नाहीं, तर त्या साहित्याचा काय उपयोग? सैन्य सिद्ध झालें, परंतु, सरहद्दीस पोंचण्यास पाहिजे तितका जर अवकाश नाहीं, तर त्या सैन्यानें काय करावें? ह्मणून, कार्य व्हायाच्या वेळेच्या आधीं बराच वेळ साहित्याची तयारी असावी, हें आवश्यक आहे, आणि तरच कार्य साधतें. ड्यूक आफ् वेलिंग्टन ह्यास कोणीं विचारिलें कीं, तुमच्या सगळ्या कामांत तुह्मांला यश येतें, ह्यांतलें बीज काय आहे? त्यानें त्यास उत्तर दिलें कीं, कोणत्याही कार्याच्या साहित्याची तयारी मी आधीं अर्धा तास करीत असतों, त्याच्या योगानें मला त्यांत यश येतें. ह्याचें तात्पर्य असें कीं, त्याच्या कार्यास वेळाची वाण कधीं पडत नसे.

आपलें कांहीं आयुष्य चोरीस जातें, कांहीं हातांतून निसटून जातें, आणि त्यांतून राहातें तें आपल्या उपयोगीं पडण्यासारखें असतें. झोंपेंत आणि आळसांत आयुष्य जातें, तें चोरीस जातें असें वाटतें. आणि केवळ जनरीतीस मान्य होण्याकरितां लोकांशीं गप्पा मारण्यांत जें आयुष्य जातें, तें हातांतून निसटून जातें, असें आह्मी ह्मणतों. ह्याशिवाय जें राहतें तें आपल्या उपयोगीं पडण्यासारखें—आपल्या स्वाधीन असतें. त्याचा उपयोग चांगल्या कामाकडे—स्वपरहितकार्यीं—केला, तर तें आयुष्य आपलें खरें असें होतें; आणि तेंच अन्यत्र प्रकारें खरचिलें, तर नाशास कारण होतें. त्यांब ह्यानें एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे

कीं, "मी नांवानें मात्र पन्नास वर्षांचा झालों आहें. त्यांत जें माझें आयुष्य लोकांकडे खरचिलें आहे, तें वजा घातलें ह्मणजे बाकी जें आयुष्य राहील त्यावरून पाहिलें असतां मी तरुणच दिसेन." खरें आहे. मनुष्याचें आयुष्य त्याच्या वर्षांवरून गणूं नये, तर, त्याच्या कृत्यांवरून गणावें. जमिनीचें मोल तिच्या आकृतीवरून गणूं नये, तर तिच्या उत्पन्नावरून गणावें. डाक्टर म्याकिकन ह्मणाले कीं, "जस्टिस काशिनाथ त्रिंबक तेलंग हे फार वर्षें जगले नाहींत, हें खरें आहे, पण ते फार जगले ह्यांत संशय नाहीं."

मंदबुद्धि आळशांस वेळाचें काय करूं असें होतें. कांहीं केल्या त्यांचा वेळ जात नाहीं. अशीं माणसें हीं धनवान वेड्यांसारखीं होत. ह्मणजे धनाढ्य वेड्यांस पैशांचा सद्व्यय कळत नाहीं, तसा मंदबुद्धि आळशांस वेळाचें काय करावें हें समजत नाहीं. खरें ह्मटलें असतां, मनुष्य कोणत्याही स्थितींत असो, त्याला करतां येण्यासारखीं कामें इतकीं असतात कीं, तीं तो करूं लागला तर त्याला वेळ पुरायाचा नाहीं. सर आर्थर हेल्पूस हा ग्रंथकार अशा माणसांस लक्षून ह्मणतो, "ही सगळी सृष्टि अगदीं शून्य आहे काय? हींत विचार करण्यासारखें कांहीं नाहीं काय? अहो, ही पृथ्वी, हें वातावरण आणि हें आकाश हीं विलक्षण चमत्कारांनीं भरलीं आहेत. ते चमत्कार तुह्मांस कळत नाहींत. परंतु, आह्मांकडे पाहा आणि आह्मांविषयीं विचार करा असें ह्मणूनच जणुकाय ते तुमच्या पुढें पुढें येत आहेत! सृष्टि ह्मणते, मजपाशीं बोला, माझें गुह्य समजून घ्या, मला जिंका, आणि तेणेंकरून सुखी व्हा. चला, उठा, कांहीं तरी शिका, कांहीं तरी करा, कांहीं तरी समजून घ्या, आणि मला आतां कांहीं करायाचें

नाहीं, असें कधीं तोंडाबाहेर काढूं नका." खरोखरच, मनुष्यास ह्या जगांत इतकें शिकावयाचें आहे कीं, त्यास त्याचें सगळें आयुष्य काय, पण शेंकडों जन्म देखील पुरावयाचे नाहींत. अगदीं म्हातारा निरक्षर शेतकरी कां घ्याना; त्याला देखील शेतकीच्या संबंधाच्या पुष्कळ नव्या गोष्टी शिकतां येतील. मग ज्यांस ज्ञानदृष्टि प्राप्त झाली आहे, ज्यांस अनेक शास्त्रांच्या अध्ययनानें सृष्टीचीं अनेक अंगें दृश्यमान झालीं आहेत, त्यांस शिकावयाच्या गोष्टी कोट्यवधि दिसाव्या, आणि आपणांस प्राप्त झालें आहे तें ज्ञान, पृथ्वीवरच्या सगळ्यांत मोठ्या वाळवंटांतला एक रेतीचा कण आहे असें वाटावें, हें साहजिक आहे. विचारपूर्वक डोळे उघडून पाहिलें मात्र पाहिजे. विचार करण्यासारखें नाहीं असें एक देखील स्थळ माणसास आढळावयाचें नाहीं.

आपलें आयुष्य आपल्या अखेरीपर्यंत आपणास पुरणार आहे, ही गोष्ट खरी आहे. परंतु, नुसत्या आयुष्यानें इष्ट कार्यें होत नाहींत. तर, त्या आयुष्याच्या भागाभागाच्या महात्म्यानुरूप कार्यें साधत असतात. विद्याभ्यास बाळपणीं व्हावयाचा; उद्योग आणि साहस हीं भर उमेदींत व्हावयाचीं; विचार आणि बोध हे वृद्धापकालीं व्हावयाचे. विद्याभ्यास म्हातारपणांत व्हावयाचा नाहीं; साहस आणि मोठे उद्योग बाळपणांत व्हावयाचे नाहींत. डोळ्यांनीं कमी दिसूं लागल्यावर, ग्रंथावलोकन करितां यावयाचें नाहीं. अंगांतली शक्ति क्षीण झाल्यावर देशाटनासारखीं श्रमांचीं कामें करतां यावयाचीं नाहींत. म्हणजे, एकंदरीनें सांगावयाचें एवढेंच आहे कीं, आयुष्यामध्यें ज्या ज्या वेळीं जें जें व्हावयासारखें असतें, तें तें हरयत्नानें यथा-

शक्ति करून टाकिलें पाहिजे. आज आज उद्यां उद्यां करून लांबणीवर टाकूं नये. कां कीं, 'उद्यां' आपले हातीं येतो कीं नाहीं, ह्याचा नेम कोणाच्यानें सांगवत नाहीं. शिवाय, आयुष्य हातीं असतांही आपलीं इष्ट कामें आपणांस करतां येतीलच, असा नेम सांगवत नाहीं. ह्मणूनच ह्मटलें आहे:—

**श्लोक.**

**जों हे स्वस्थ तनू जरा वसतसे जों दूर जों इंद्रियें**
**शक्तें कीं सरलें न आयु पुरतें जों पंडितानें स्वयें**
**आत्मप्राप्तिसुखार्थ यत्न करणें कीं तोंच हा फारसा**
**होतां मंदिर दीप्त कूपखननीं उद्योग तो कायसा.**

**वामन.**

**श्लोकार्ध.**

**दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें**
**धरील मन आधिनें बहुपरि भ्रमे चाकसें,**

**मोरोपंत.**

**अभंग.**

**कांहीं धांवाधांव करीं**
**जोंवरि आहे मृत्यु दूरी.**

**तुकाराम.**

एकादा अत्यंत कृपण माणूस जसा कवडीकवडीला जपत असतो, तसा शाहाणा माणूस आपल्या आयुष्याच्या प्रत्येक क्षणास जपत असतो. कृपण मनुष्य कवडी कवडी संग्रहीं टाकितो, आणि शाहाणा मनुष्य आपल्या आयुष्याच्या प्रत्येक क्षणाचा कांहीं तरी चांगला उपयोग करितो. फ्लिनी ह्यानें आपल्या स्वतःच्या व्यवसायाविषयीं एका मित्रास पत्र लिहिलें आहे. त्यांत असें आहे कीं, " मी शिकारीला जातों, तेव्हां

देखील मी आपलें पुस्तक बरोबर नेतों. तें अशाकरितां कीं, चाकरमाणसें पारधीची आणि इतर सामानाची व्यवस्था लावण्यांत गुंततात तितक्या वेळांत मी तें थोडेंसें तरी वाचतों, आणि त्यांतले विचार मनांत ठेवितों. त्याप्रमाणेंच शिकारींत कांहीं सांपडलें नाहीं तर मी आपले तेव्हांचे विचार वहीवर टिपून घरीं आणितों. तेव्हां माझ्या मनाला असें वाटतें कीं, शिकार सांपडली नाहीं, पण कांहीं नवे विचार सांपडले आहेत, हा कांहीं लाभ लहान नव्हे. कांहीं तरी मीं बाहेरून घरीं नवें असें आणिलें आहे. माझा दिवस फुकट गेला नाहीं."

अशी वृत्ति झाली पाहिजे. मरण ही मुहूर्तघटिका आहे. आणि आपणाच्यानें होण्यासारखें जितकें काम आहे, तितकें करणें हें आपलें कर्तव्य आहे, हें लक्षांत ठेवून दुनयेंत राहावें. पळभरही वेळ व्यर्थ दवडूं नये, आणि चांगलें कार्य केल्यावांचून राहूं नये—कधीं स्वस्थ बसूं नये—ह्यांत सगळें आहे.

आयुष्य ही परमेश्वराची मोठी देणगी आहे. ही देणगी अशी आहे कीं, ही देणगी दुसऱ्या कोणाच्यानें देववणार नाहीं, आणि ही असल्यावांचून मनुष्यास कोणतेंही कृत्य करितां यावयाचें नाहीं. तर, हिचा उपयोग आपण फार जपून केला पाहिजे. ही सत्कार्याकडे खरचिली पाहिजे, आणि हिचा अत्यंत अल्प देखील अंश फुकट जाऊं देतां कामास नये. असें केल्यानें आपलें हित होऊन परमेश्वरास संतोष होणार आहे. ह्याकरितां, ह्या प्रकरणीं सांगितलेल्या गोष्टी निरंतर लक्षांत ठेवून वागावें, हें आवश्यक आहे.

# २०.

## धर्म.



प्रपंचांत धर्म हा एक मोठा आधार आहे. संकट-समयीं इतर कोठें आश्रय मिळेनासा झाला, तरी धर्मांत आश्रय मिळतो. धर्मानें समाधान होतें, तें दुसऱ्या कशानेंही होत नाहीं. कौरवांपासून बलात्कारानें राज्य परत घेण्याविषयीं भीम आग्रह करीत असतां, धर्मराजानें त्यास ह्मटलें:—

### आर्या.

प्राणास तुह्मांसहि मी त्यजिन न धर्मासि पळहि सोडीन
हें व्रत धर्मचि रक्षू बापा न कदापि अयश जोडीन. १.
बा गा धर्माच्या तो कोणीं सोडूं नयेचि कांसेतें
निष्फल होती मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें[1]. २.
निजहितकर धर्माचें कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं
यापरि पोषण पालन लालन करिजे न अन्य जनकांहीं. ३.
अंभोदास पहाती जैशीं पसरोनि नित्य आ शेतें
धर्मासि तशीं भूतें करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें. ४.
साधु ह्मणति जो न करी धर्माशीं नीतिशीं विरोधा त्या
रक्षीं व्यसनीं तदितर जन उदकीं लोष्टसा[3] विरो धात्या[4] ५.

असें आणखी पुष्कळ प्राचीन ग्रंथांत मोठमोठ्यांनीं ह्मटलें आहे. आणखी प्राचीन काळापासून कितीएक माणसांस धर्म हा नकोसा वाटून, तो नाहींसा करण्याविषयीं त्यांनीं लहानमोठे प्रयत्न केले, त्यांपासून मोठाले अनर्थ मात्र ओढवले; दुसरें कांहीं

---

१ शेतें. २ मेघास. ३ ढेंकळासारखा. ४ ब्रह्मदेवा.

झालें नाहीं. ह्याचें एक मोठें उदाहरण फ्रान्साचें आहे. इ० स० १७७१ ह्या वर्षीं जी राज्यक्रांति झाली, तींत धर्म अगदीं नाहींसा करण्याचा प्रयत्न चांगल्या चांगल्या बलिष्ठ पुष्कळ लोकांनीं केला. धर्मशास्त्राचीं पुस्तकें फाडून रस्त्यांत फेंकिलीं, देवालयांच्या पागा केल्या, आणि "मृत्यु ही निद्रा आहे" अशीं मोठमोठीं अक्षरें जागोजाग लिहिवविलीं. एवढेंच केवळ नव्हे; तर, जीं माणसें आपणांस धर्मनिष्ठ ह्मणवीत होतीं, त्यांस हाल हाल करून ठार मारिलें. इतकें केलें, तरी, धर्म नाहींसा झाला नाहीं. नेपोलियन बोनापार्टीनें, पुनः राज्यव्यवस्था लाविली, तेव्हां त्याला धर्मसंस्था ठेवावी लागली. तीशिवाय लोकस्थिति नीट चालेना. ही जशी राष्ट्राची गोष्ट आहे, तशीच माणसांचीही गोष्ट आहे. धर्मावांचून त्यांचें चालत नाहीं.

ह्यावरून एवढें खचीत झालें कीं, राष्ट्रास काय आणि मनुष्यास काय धर्म पाहिजे. मनुष्यास तहान लागल्यावर जसें पाणी हवेंसें वाटतें, तशी त्याला धर्माची तहान लागते, आणि धर्मश्रद्धा प्राप्त झाल्यावांचून ती भागत नाहीं.

कितीएकांचें मत असें पडतें कीं, देव, त्याची सत्ता, धर्म, स्वर्ग, नरक हें सगळें थोतांड आहे. तें अजाण माणसांची समजूत घालण्याकरितां धूर्त माणसांनीं रचिलें आहे. ह्यावर विचारणें एवढेंच आहे कीं, ह्या थोतांडाच्या जाळ्यांत आजपर्यंत सांपडले असे पुष्कळ झाले, आणि ह्या जाळ्याविषयीं संशय घेणारे असे अगदीं थोडे–शेंकडा किंवा हजारीं एक देखील नाहीं–असे निघाले, हें झालें तरी कसें ? जे कोट्यवधि लोक धार्मिक झाले, त्यांत कितीएक अत्यंत चतुर होते. त्यांचे ग्रंथ सर्वमान्य आहेत. त्यांना हें थोतांड समजूं नये काय ? बरें,

क्षणभर तें थोतांड आहे, अशी कल्पना केली, तरी त्यापासून कांहीं वाईट होतें आहे काय? प्राचीन कालच्या धर्मच्छलाच्या गोष्टी एकीकडे असोत. परंतु, सध्यांच्यासारख्या स्वस्थतेच्या आणि धर्मौदार्याच्या युगांत धर्मश्रद्धेच्या योगानें अहित असें कांहींएक होत नाहीं, एवढेंच केवळ नव्हे, तर तिच्या योगानें सामाजिक उन्नतीचीं कितीएक महत्कार्यें होतात. सध्यांच्या मोठमोठ्या माणसांचे ठायीं धर्मश्रद्धा चांगली आहे. नामदार ग्ल्याडस्टनसाहेब हे मोठे धार्मिक आहेत. ते स्वतः कधीं कधीं धर्मोपदेश करीत असतात, असें सांगतात. आपणां हिंदुस्थान-वासी सर्व लोकांस अत्यंत प्रिय आणि वंद्य झालेले व्हाइसराय आणि गव्हरनर जनरल लार्ड रिपन हे मोठे धार्मिक आहेत, अशी त्यांची आख्या आहे. ते प्रार्थना करायास कधीं चुकत नाहींत. सध्यांचे जर्मनीचे बादशाहा विलियम्स हेही चांगले धार्मिक आहेत. ते सिंहासनारूढ झाल्यापासून नुसत्या बर्लिन शहरांत चोवीस भजनालयें नवीं बांधिलीं. कांहीं वर्षांमागें आफ्रिकेंतल्या एका राजानें महाराणीसाहेब व्हिक्टोरिआ ह्यांस असें विचारणें पाठविलें कीं, आपणांस जें एवढें वैभव प्राप्त झालें आहे, त्याचें मुख्य साधन काय आहे? त्याचें उत्तर ह्मणून, महाराणीसाहेबांनीं त्याजकडे एक ख्रिस्ती पवित्रशास्त्राचें पुस्तक पाठवून दिलें. त्याप्रमाणें आमचीं पुराणें आणि इतिहास पहा. आमचे राजेरजवाडे आणि थोर पुरुष मोठे धार्मिक होते. हरिश्चंद्राप्रमाणें, कांहीं पुरुष धर्मार्थ नानाप्रकारचे भयंकर क्लेश सोसण्यास तयार होते, हें आपणांस ठाऊक आहेच. ह्या सगळ्या उदाहरणांवरून एवढें सिद्ध होतें कीं, मनुष्यास धर्मश्रद्धा आवश्यक आहे. तीशिवाय त्याचें चालत नाहीं.

धर्मश्रद्धेवांचून माणसांचें चालत नाहीं, हें खरें आहे. तेव्हां, धर्माच्या संबंधानें त्यांचा शोध चालत असला पाहिजे, हें उघड आहे. हा शोध फार प्राचीन काळापासून चालत असल्याचा इतिहास उपलब्ध आहे. परंतु, त्या शोधास ह्या एकुणिसाव्या शतकांत, धर्मौदार्याच्या अभिवृद्धीच्या योगानें, विशेष आवेश आला आहे, असें दिसतें. त्यांतही कांहीं कांहीं धर्म, इतर धर्मांस खोटे आणि भ्रांतिमूलक ठरवून, आपण पुढें सरायास पाहात आहेत. अशा वेळीं तर हा विचार सर्व माणसांनीं फार पोक्तपणानें करायास पाहिजे आहे. ह्मणजे सध्यां असें झालें आहे:—

## अभंग.

**आतां शरण कोणा जावें सत्य कोणातें मानावें. १.**
**नाना पंथ नाना मतें भूमंडळीं असंख्यातें. २.**
**एक मानिती सगुण एक मानिती निर्गुण. ३.**
**एकीं केला सर्व त्याग एक ह्मणती राजयोग. ४.**
**रामदास सांगे खुण भक्तीवीण सर्व शीण. ५.**

**आतां कोठें धरूं भाव बहुसाळ झाले देव. १.**
**एकाहुनी एक थोर मुख्य पूजा पारंपार. २.**
**माझे कुळींचीं दैवतें सांगों जातां असंख्यातें. ३.**
**रामदासा देव एक येर सर्वही मायिक. ४.**

रामदास.

अशी त्रेधा आमच्या देशांतल्या समंजस आणि सुशिक्षित तरुणांची सध्यां झाली आहे. आणखी, ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज आणि आर्यसमाज हे त्याचे परिणाम आहेत. अनेक

धर्म दृष्टीस पडतात, त्यांतला खरा कोणता, हें समजत नाहीं; खरा काय तो मी, आणि बाकीचे सगळे धर्म खोटे, असा आग्रह बहुतेक धर्मांचा दिसतो. आणि कांहीं धर्मांचें मत असें आहे कीं, "स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावः" ह्यांतलें हें दुसरें मत, विचारशीलांस, विशेष ग्राह्य वाटतें. धर्म ह्मणजे ईश्वरप्राप्तीचा मार्ग, ही व्याख्या घेऊन चाललें ह्मणजे, हेंच मत सर्वांस कबूल करावें लागेल.

खरा प्रकार आकाशांतून कोणी पाहून आला नाहीं. कोणताही धर्म घेतला, तरी, त्याविषयीं सगळीं अनुमानें आहेत. तीं, त्या त्या दृष्टीनें पाहिलीं ह्मणजे सगळीं खरीं वाटतात. एकही खोटें ह्मणवत नाहीं. ह्मणजे तें थोडेंसें ह्यासारखें होतें. आठ आणि एक नऊ; सात आणि दोन नऊ; साहा आणि तीन नऊ; आणि पांच आणि चार नऊ; ह्यांतलें खरें कोणतें, असें कोणीं विचारिलें, तर त्यास काय सांगावें ? सगळीं खरीं आहेत, असें सांगणें भाग आहे. तोच प्रकार धर्माच्या खरेपणाच्या प्रमाणांचा होतो. हीं प्रमाणें खरीं मानण्यास आधीं श्रद्धा पाहिजे; शोध नको आहे. येशू ख्रिस्त सदेह आकाशीं गेला, हें निष्ठापूर्वक खरें मानावें, तसें, तुकाराम महाराज सदेह आकाशीं गेले, हेंही निष्ठापूर्वक खरें मानावें. खरें मानण्यास दोहोंसही निष्ठा ह्मणजे भाव पाहिजे आहे. आणखी, ख्रिस्ती धर्माच्या खरेपणाचा शोध करण्याविषयीं जो काय बोध केलेला असतो, त्यांतही, तो शोध प्रार्थनापूर्वक करावा, असें मोठ्या आग्रहानें सांगितलेलें असतें. आणि तें बरोबर आहे. "भाव तेथें देव."

हा भाव धरून जे लोक भक्ति करितात, त्यांत मुख्य

दोन पंथ आहेत; सगुणभक्ति आणि निर्गुणभक्ति. सगुणभक्ति करणारे लोक मूर्तिपूजा इत्यादिकांत मग्न असतात. निर्गुण-भक्ति करणारे जे आहेत, ते देव निराकार समजून त्याचें ध्यान आणि मनन करितात. ह्यांत एकाही प्रकारास नांव ठेवण्यास कारण नाहीं. कां कीं, मुख्य भाव हें जर भक्तीचें बीज आहे, तर, तें बीज जेथें असतें, तेथें भक्ति व्हावयाची, हें उघड आहे; मग त्या भक्तीचे मार्ग वेगळे वेगळे असल्यानें कांहीं मोठें पाप होत नाहीं. ह्मणून मूर्तिपूजकांस, निराकार देवाचें ध्यान भजन करणारे लोक नांवें ठेवितात, "मूर्तिपूजक" हें गौण नांव त्यांस कधीं कधीं ठेवितात, हें ठीक नाहीं. आह्मांला तर असें वाटतें कीं, ह्या पृथ्वीच्या पाठी-वर मूर्तिपूजक माणसें मुळींच नाहींत. आह्मी हिंदु लोक मूर्तीची पूजा करितों, ह्मणून आह्मांस ते मूर्तिपूजक ह्मणून कमी लेखतात. पण आह्मी असें ह्मणतों कीं, आह्मी मूर्तिपूजक नाहीं. बाजारांत कांसारांच्या दुकानांत पुष्कळ मूर्त्ति विकायास मांडलेल्या आह्मी नेहमीं पाहातों, पण आह्मी त्यांच्या पायां पडत नाहीं. तसेंच गणपति विकतात, तेथल्या सगळ्या गणपतींच्या आह्मी पायां पडत सुटत नाहीं. घरीं आ-णून प्राणप्रतिष्ठा केल्यावर मग—ह्मणजे त्यामध्यें देवाचा अंश आला आहे असें आमच्या मनानें घेतल्यावर मग—आह्मी त्याची पूजा अर्चा करितों. ह्मणजे, आह्मी मूर्तीची पूजा क-रीत नाहीं, तींत जो देवांश आला आहे असें आह्मी मानितों त्या देवांशाची पूजा करितों. ह्मणून, आह्मी मूर्तिपूजक नाहीं आहों, तर देवपूजक आहों.

कांहीं माणसें धर्मान्तर करितात, त्यांस कांहीं लोक नांवें

ठेवितात, ह्याविषयीं चांगला विचार केला पाहिजे. धर्म हा परमेश्वराकडे जाण्याचा मार्ग आहे. आणि मूळरूपानें सगळे धर्म सारखे आहेत. एका ठिकाणीं जाण्यास कधीं कधीं अनेक मार्ग असतात. त्यांत ज्यास जो मार्ग जवळचा दिसला, त्या मार्गाचें अवलंबन त्यानें केलें, तर त्यांत कांहीं दोष नाहीं. कदाचित् तो मार्ग इतरांच्या दृष्टीनें लांबचा किंवा चुकीचा दिसतो, ह्मणून ते त्यास नांवें ठेवितात. परंतु, तें बरोबर नाहीं. लोकांच्या हंसण्याकडे लक्ष देण्यापेक्षां आपल्या आत्म्याच्या तारणाकडे लक्ष द्यावें हें योग्य आहे. सगळ्यांत आत्मा श्रेष्ठ आहे.

## आर्या.

**राया कुलार्थ पुरुष ग्रामार्थ कुळहि समस्त सोडावें**
**ग्रामहि देशार्थ मही आत्मार्थ बुधें भलेंचि जोडावें.**

मोरोपंत.

असें आहे. आणखी, खरोखर आत्म्याच्या तारणाकरितां ह्मणजे देवाकडे जाण्याकरितां, धर्मांतर करण्यांत जरी कांहीं चुक्या झाल्या, तरी, परमात्मा हेतूकडे पाहून आपल्या भक्तास साह्य करील. त्याच्या अज्ञानमूलक चुकीबद्दल त्याला शासन करणार नाहीं. लहान मुलानें, अज्ञानाच्या योगानें, आईस आई न ह्मणतां ताई ह्मटलें, किंवा नांवानें हाक मारिली, तरी तिला त्याचा कधीं राग येत नाहीं, कौतुकच वाटतें. त्याप्रमाणें, भक्ति करण्यांत जरी कशाही चुक्या झाल्या, तरी, जर ती भक्ति मनापासून आहे—खरी आहे—तर ती परमेश्वरास आवडते. बाह्यात्कारीं पोकळ खोटी भक्ति आवडत नाहीं. आणि तशा भक्तीनें तो कधीं वळावयाचा नाहीं.

## आर्या.

गुळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा
सत्य प्रेमचि दावुनि सुखें तो विश्वपाळ कवळावा.

मोरोपंत.

मूळरूपानें सगळे धर्म एकसारखे असतां, मनुष्यास धर्मांतर करण्याची इच्छा कां व्हावी—एका धर्मापेक्षां दुसरा धर्म कां चांगला दिसावा—हा एक बराच मोठा प्रश्न आहे, असें प्रथमदर्शनीं वाटतें. परंतु, त्यांत फारसें काठिण्य नाहीं. पाहा. एका माणसास फार तहान लागली आहे, त्यास पाणी पिण्याविषयीं फार इच्छा झाली आहे, आणि तेथें दोन रुप्याचे गडवे पाण्यानें भरले आहेत. त्यांतला एक आंतूनबाहेरून चक्क घांसलेला आहे, आणि दुसरा अमळ जुना आसल्यामुळें बाहेरून अमळसा काळसर दिसत आहे. आणखी त्या माणसाची अशी खातरी आहे कीं, त्या दोन्ही भांड्यांतलें पाणी अगदीं एकसारखें निर्मळ असून, एकाच ठिकाणाहून एकदम आणलेलें आहे, आणि दोन्हीं भांडीं आंतून एकसारखीं स्वच्छ घांसलेलीं आहेत. तर, त्याला, कोणत्या भांड्यांतलें पाणी घेण्याची साहजिक इच्छा होईल बरें ? स्वच्छ भांड्यांतलें पाणी तो पिईल, ह्यांत कांहीं संशय नाहीं. तोच प्रकार धर्मांचा आहे. मनुष्यास अधोगतीस नेणारा असा एकही धर्म नाहीं. सगळे मोक्षाचे मार्ग आहेत. परंतु त्यांत असें झालें आहे कीं, कोणत्याही कारणानें ह्मणा, कितीएकांवर मालिन्य चढलें आहे, आणि कितीएकांचें मालिन्य साधुपुरुषांनीं काढून टाकून, ते चांगले सुंदर दिसतसे केले आहेत. आणखी, धर्मस्वातंत्र्याचा हा काल आहे. ह्मणजे ज्यास जो धर्म बरा वाटतो, त्यास तो घेण्यास मोकळीक आहे. तेव्हां, जो धर्म चक्क दिसतो,

ज्याच्यामागें, प्राचीन काळचीं आणि सांप्रत काळचीं शाहाणीं शाहाणीं माणसें जातांना दृष्टीस पडतात, तो धर्म चांगला वाटावा—ह्मणजे देवाकडे पोंचण्याचा तो मार्ग खरा वाटावा—हें साहजिक आहे. आणखी, सध्यां कितीएक चांगलीं शाहाणीं-सुरतीं माणसें ख्रिस्ती धर्म स्वीकारीत आहेत, ह्यांतलें मुख्य कारण हें आहे. ह्याविषयीं विचारी पुरुषांस मुळींच खेद वाटत नाहीं. कां कीं, देवधर्म हें सगळें थोतांड आहे, असें समजून नास्तिक होण्यापेक्षां, कोणत्या तरी मार्गानें परमेश्वरास भजणें हें फार चांगलें आहे, असें त्यांस वाटतें, तें खरें आहे.

देव मुळीं नाहीं, असें ह्मणणें हें जसें मोठें पाप आहे, तसें, देव वाईट करितो, तो रागद्वेष इत्यादि मनोविकारांस वश होतो, हें ह्मणणें हेंही मोठें पाप आहे. प्लूटार्क ह्याविषयीं लिहितांना असें लिहितो कीं, "प्लूटार्क मुळींच जन्मला नाहीं, आणि तो मुळींच नाहीं, असें कोणीं ह्मटलें तर मला पतकरेल; परंतु, प्लूटार्क हा दुर्गुणी आहे, आणि तो कामक्रोधादिकांस वश आहे, असें कोणीं ह्मटल्यास तें मला आवडावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें अकर्मांचा संबंध देवाकडे लाविला तर तो त्यास आवडावयाचा नाहीं." ह्मणूनच जे कोणी खरे धार्मिक आहेत, ते देवाकडे वाईटपणा कधीं देत नाहींत, आपणांकडे घेतात. सुख होतें तेव्हां त्याचे आभार मानितात, दुःख होतें तेव्हां त्याची इच्छा आहे ती चांगलीच आहे, असें ह्मणून स्वस्थ बसतात. ही रीति चांगली आहे.

धर्मांतल्या कितीएक गोष्टी अद्यापपर्यंत कोणालाही कळल्या नाहींत, आणि त्या पुढें कधीं कळतील अशी आशाही नाहीं. तेवढ्यावरून त्या गोष्टींत कांहीं अर्थ नाहीं, असें स-

मजूं नये. त्या माणसांस कळत नाहींत, हें त्यांचें अज्ञान समजावें. आणखी कदाचित् कांहीं काळानें त्या गोष्टी कळतील, असें घेऊन चालावें. पृथ्वी उत्पन्न झाल्यापासून कित्येक हजार वर्षेंपर्यंत माणसांची समजूत अशी होती कीं, पृथ्वी ही स्थिर आहे, आणि सूर्य फिरत आहे. परंतु, खरा प्रकार अगदीं त्याच्या उलट आहे, तो आतां स्थापित झाला आहे. तसें कदाचित् धर्मसंबंधीं गोष्टींविषयीं होईल, अशी आशा कां करूं नये ?

पोलिसाचे शिपाई आपले संनिध उभे आहेत, असें जे कोणी समजतात, त्यांच्या हातून कायद्याविरुद्ध कर्म कधीं होत नाहीं. त्याप्रमाणें धर्म खरा आहे, असें ज्यांच्या मनांत ज्या ज्या मानानें ठसलेलें असतें, त्यांच्या हातून त्या त्या मानानें पापें कमी होतात. आणि वेळाचा सद्व्ययही त्यांच्या हातून पुष्कळ होतो. ह्यास उदाहरणें ह्मटलीं ह्मणजे साधुजनांचीं चरित्रें होत. आणखी त्यांच्या तोंडांतून उद्गारही तसेच बोधपर निघत असतात. सद्वर्तनाविषयीं तुकाराममहाराजांनीं आपल्या अभंगांमध्यें आणि समर्थांनीं आपल्या दासबोधामध्यें किती आग्रह केला आहे, हें सर्वांस ठाऊक आहेच. मार्कस आरिलियस ह्यानें आपल्या ग्रंथांत माणसांस लक्षून उपदेश केला आहे कीं, "आपणांस दहाहजार वर्षें जगावयाचें आहे, असें समजून जगांत वागूं नका. मृत्यु पदोपदीं तुह्मांजवळ उभा आहे. जीवंत आहां तोंपर्यंत चांगलें होणें हें तुमच्या हातचें आहे. कदाचित् आतां ह्या क्षणीं आपणांस मरण येईल, असें समजून, निरंतर आपले विचार आणि आपलीं

कृत्यें ह्यांचें नियमन करा." हा बोध किती तरी चांगला आहे! आणखी—

### श्लोक.

काळ चोर घिरल्या घरिं घाली
पामरा निज कशी तुज आली
जाग तूं निशिदिनीं लवलाहें
जातसे वय अमोलिक पाहें.

वामन.

धर्मविचार परम गहन आहे. त्यांत जों जों मन घालावें, तों तों तो अधिकाधिक गहन दिसूं लागतो. हीरो ह्यानें सिसमांडिस ह्यास एकदां ह्मटलें कीं, देव ह्मणजे काय तें मला सांग. त्यास त्यानें प्रथम एका दिवसाचा अवकाश मागून घेतला, मग दोन दिवसांचा घेतला, त्यानंतर चार दिवसांचा घेतला, पुढें आणखी आठ दिवसांचा मागितला, असें होतां होतां त्याची मागणी सरेनाशी झाली. शेवटीं त्यानें त्यास सांगितलें कीं, देव काय आहे, ह्याचा विचार जों जों करीत जावें, तों तों त्याविषयीं आपलें अज्ञान मात्र आपणांस अधिकाधिक दिसूं लागतें.

तरी, देव ह्मणजे काय हें जें काय जगास समजलें आहे, तेवढ्यानें त्याच्या अंतःकरणास शांति प्राप्त होते, आणि त्याचें इहलोकचें वर्तन सर्वप्रिय होतें. हा अनुभव सर्वत्र आहे.

# २१.

## आशा आणि उन्नति.



मुलें शाळांत शिकत असतात; शेतकरी जमीन नांगरीत असतात; व्यापारी मालाचा क्रयविक्रय करीत असतात; राजे नवे नवे देश काबीज करीत असतात; भिक्षेकरी भीक मागत असतात; तपस्वी तपश्चर्या करीत असतात; इत्यादि जे लक्षावधि व्यवहार मनुष्यें नानाप्रकारचे कष्ट सोसून एकसारखे करीत असतात, त्यांचा विचार सूक्ष्म दृष्टीनें केला ह्मणजे असें स्पष्ट दिसून येतें कीं, ह्या सगळ्यांच्या बुडीं आशा आहे. ती आशा ही कीं, आपणास जी स्थिति प्राप्त आहे, तिजपेक्षां अधिक चांगली स्थिति मिळवायाची. ही आशा सगळ्या उद्योगांची जननी आहे. ही आशा मनुष्याच्या अंतःकरणांत परमेश्वरानें त्याच्या कल्याणाकरितां ठेविली आहे. आणि सृष्टींतल्या इतर सर्व वस्तूंवर मनुष्याचें स्वामित्व जें वाढत चाललें आहे, तें सगळें ह्या आशेचें कर्तृत्व आहे. हिजविषयीं विचार करणें हें, विचारशील प्रपंची मनुष्यास, एक फार चांगलें विश्रामस्थान आहे.

ही सृष्टि परमेश्वरी चमत्कारांनीं भरली आहे. कोणत्या वस्तूंत कोणते गुण आहेत, आणि त्या गुणांचा उपयोग काय आहे, ह्याचा अंत लागत नाहीं. विद्वान् लोकांच्या परिश्रमांच्या योगानें असे नवनवे शोध लागत चालले आहेत कीं, त्यांविषयीं, मागच्या विद्वान् लोकांस कल्पना देखील नव्हती. फार प्राचीन काळची गोष्ट नको. फ्रान्स देशामध्यें एम. कोम

ह्या नांवाचा कोणी एक फार मोठा विद्वान् मनुष्य होऊन गेला. त्यानें इ० स० १८४२ ह्या वर्षी एका ग्रंथांत खस्थ पदार्थांविषयीं असें लिहिलें आहे कीं, "खस्थ पदार्थांचे आकार, अंतरें, महत्व आणि त्यांच्या गति हीं आपणांस काढतां येतील; परंतु, ते पदार्थ कशाचे बनले आहेत, आणि त्यांचे ठायीं रसायनधर्म काय आहेत, ह्याचा निर्णय आपणांस कधींही करितां यावयाचा नाहीं." परंतु, आलीकडच्या पन्नास वर्षांच्या शोधांनीं हा लेख अगदीं खोडून काढिला आहे. खस्थ पदार्थांच्या घटकावयवांच्या रसायनधर्मांचें ज्ञान, माणसांस झालें आहे. त्या संबंधाचें एक वेगळें शास्त्र झालें आहे. आणि त्याची वृद्धि मोठ्या झपाट्यानें चालली आहे.

वीज प्रकाशमान आहे, ही गोष्ट कांहीं नवी नाहीं. फार जुनी आहे. ती मनुष्यांस सहस्रावधि वर्षांपासून ठाऊक आहे. त्या प्रकाशाचा उपयोग आपणांस व्हावा, अशी इच्छाही माणसांस पुष्कळ दिवसांपासून झालेली आहे. कार्बनाची बारीकशी काडी निर्वात काचपात्रांत ठेवून तिजमधून जर विद्युत्प्रवाह वाहूं दिला, तर, तींतून प्रकाश पडतो, परंतु, त्या प्रकाशांत उष्णता अतिशयित असल्यामुळें तें काचपात्र तात्काळ फुटतें, असा अनुभव आल्यामुळें, त्या प्रकाशाचा उपयोग करण्याचा नाद माणसांनीं सोडून दिला होता. परंतु, अशा स्थितींत तें काचपात्र फुटूं नये, अशी युक्ति एडिसन ह्यांनीं काढिली. तिच्या योगानें सगळी अडचण दूर होऊन, आतां विजेचे दिवे जिकडे तिकडे वापरूं लागले आहेत.

छापण्याची कला ही अगदीं नवी आहे, असें पुष्कळ लोकांस वाटतें. परंतु, विचार करून पाहिला असतां, ती नवी

नव्हे, जुनी आहे, फार जुनी आहे, असें ह्मणावें लागतें. ह-
जारों वर्षांच्या पूर्वींच्या इतिहासावरून असें कळतें कीं, प्राचीन
काळीं देखील शिक्के मोर्तबें राजांच्या दरबारीं असत. त्या शिक्के
मोर्तबांच्या युक्तीची अभिवृद्धि किंवा चांगली वाढ होऊन, ही
छापण्याची कला सिद्ध झाली आहे.

क्लोरोफार्म ह्मणून एक पदार्थ कोणीं शोधून काढिला आहे.
त्याचा संचार आंगांत झाला ह्मणजे मनुष्यास सुखदुःखाचें
भान नाहींसें होतें. ह्मणजे, मनुष्य जीवंत राहून, त्या जीवाचा
मुख्य शारीरव्यापार जी जाणीव, ती नाहींशी होते. मनुष्याचा
दांत चटकर उपटून काढावा, किंवा कारणपरत्वें त्याचा हात
पाय कापावा तरी त्याला तें तेव्हां मुळीं कळत देखील नाहीं.
ह्मणजे ह्या पदार्थानें शरीर आणि मन ह्यांचा अगदीं संबंध तु-
टावा, किंवा तो संबंध अगदीं नाहींसा व्हावा, असें होतें.
ह्याची कल्पना देखील पूर्वीं कोणाच्या मनांत आली नव्हती.
आणखी आलीकडे दुसरी एक औषधि अशी सांपडली आहे
कीं, ती आंगास लाविली असतां, तेथची शुद्धि नाहींशी होते;
ह्मणजे तेथें अगदीं बधिरपणा येतो; तेथें जखम केली तरी क-
ळत नाहीं. ह्मणजे, मनुष्य आणि त्याचा देह ह्यांची अगदीं
तुटातूट कांहीं वेळ होते, असें ह्मटलें तरी चालेल. आमचे
ऋषि ब्रह्मांडीं प्राण नेत असत, आणि बसल्यास्थानीं आंगावर
वारूळ वाढलें तरी त्यांस कळत नसे, असें जें पुराणांतरीं लि-
हिलें आहे, तें, ह्याच प्रकारचें कांहीं तरी असावें, असें वाटतें.
अशा रीतीनें सगळ्या प्रकारीं मनुष्याचें पाऊल पुढें पुढें पडत
चाललें आहे. हें सगळें अभिवृद्धीच्या आशेचें फल आहे.

अशी ही उन्नतीची आशा फार प्राचीन काळापासून माण-

सांमर्थ्ये जागृत आहे. आणि कोणत्याही एकाद्या विचाराचें प्राबल्य माणसांच्या मनांत आलें, ह्मणजे, त्याला पुढच्या आशा उद्भवतात. ह्मणजे, डोंगराचा एक कडा चढून गेल्यावर, दुसरा दिसूं लागतो, आणि दुसऱ्याच्या माथ्यावर गेल्यावर तिसरा दिसूं लागतो, असेंच ह्या शोधांचें आहे. एक शोध झाला ह्मणजे दुसऱ्याची दिशा दिसूं लागते; तो पूर्ण झाला ह्मणजे तिसऱ्याची दिशा दृश्यमान होते.

ह्या आशेनें ज्ञानवृद्धि होत चालली आहे. ती सगळ्या राष्ट्रांत सारखी चालली नाहीं. कांहींत मोठ्या झपाट्यानें चालली आहे, आणि कांहींत अगदीं सावकाश चालली आहे. जर्मनी, इंग्लंड, अमेरिका इत्यादि राष्ट्रांत ही वृद्धि मोठ्या वेगानें चालली आहे, आणि आरबस्थान, हिंदुस्थान, तुर्कस्थान इत्यादि राष्ट्रांत हळू हळू चालली आहे. तथापि एवढें खचीत आहे कीं, आजापेक्षां नातू अधिक शाहाणा असणें हें सर्वत्र आहे. शंभर वर्षांमागें शाहाण्या लोकांस जें महाज्ञान असें वाटत होतें, आणि अगदीं थोड्या बुद्धिवानांस मात्र ठाऊक होतें, तें आतां शाळांतल्या आणि पाठशाळांतल्या विद्यार्थ्यांस सहज कळत आहे.

जें दिसत नाहीं तें दिसेसें करणें हें दृग्यंत्राचें सामर्थ्य आहे. आणखी वस्तु दिसत नाहीं ती दोन कारणांपैकीं कोणत्या तरी एका कारणानें दिसत नाहीं; ह्मणजे, ती अति सूक्ष्म असल्यामुळें दिसत नाहीं, किंवा अति दूर असल्यामुळें दिसत नाहीं. ह्या दोन अडचणी दूर करण्यास आलीकडे दोन यंत्रें काढलीं आहेत; सूक्ष्मदर्शक यंत्र, आणि दुर्बीण. ह्यांपैकीं सूक्ष्मदर्शक यंत्रांत सुधारणा होतां होतां सध्यां एथपर्यंत आली आहे कीं, भिंगा-

वर एका इंचांत ९०००० बारीक बारीक रेघा काढलेल्या असतात, त्या वेगळ्या वेगळ्या दिसतात. ह्याच्यापुढें मजल गेली नाहीं. आणखी, कोणाएका मोठ्या विद्वानानें असें सिद्ध केलें आहे कीं, अत्यंत सूक्ष्म—ह्मणजे त्याहून अधिक सूक्ष्म करतां येत नाहीं असा परमाणु—ह्मटला ह्मणजे त्याचा व्यास एका इंचाच्या पन्नास कोट्यावधी—$\frac{१}{५०००००००००}$—हिश्शाइतका असतो. तेव्हां तो सध्यांच्या अत्यंत शक्तिमान् सूक्ष्मदर्शक यंत्रानें देखील दिसावयाचा नाहीं, हें उघड आहे. तथापि त्याविषयीं अगदीं निराशा नाहीं. कालेंकरून कदाचित् तो परमाणु दृश्यमान व्हावा, अशी यंत्रें माणसांस करतां येतील, अशी आशा आहे. त्याप्रमाणेंच दुर्बिणीचें आहे. नवनव्या शक्तिमान् दुर्बिणी तयार होत आहेत, आणि त्यांच्या योगानें फार दूरचे ग्रह—ह्मणजे पूर्वी मुळींच दिसत नव्हते ते ग्रह आणि तारे दिसूं लागले आहेत. ह्या दोनही यंत्रांच्या शक्ति वाढतां वाढतां माणसांस शेवटीं काय काय दिसणार आहे, ह्याचा अजमास देखील आज करवत नाहीं. एक कवि ह्या यंत्रांस ज्ञानचक्षु ह्मणतो—दिव्यचक्षु ह्मणतो.

हें केवळ माणसांच्या शक्तीविषयीं झालें. विद्वान् लोकांनीं प्रयोगांवरून असें सिद्ध केलें आहे कीं, सृष्टीमध्यें असे कांहीं अत्यंत सूक्ष्म ध्वनि आहेत कीं, ते, बारीक कीटकांस मात्र ऐकूं येतात, आणि माणसांस ऐकूं येत नाहींत. त्याप्रमाणेंच असे कांहीं प्रकाशकिरण आहेत कीं, ते क्षुद्र प्राण्यांस मात्र दिसतात, पण माणसांस दिसत नाहींत. ह्मणजे माणसांस ज्ञात नाहीं, आणि क्षुद्र प्राण्यांस ज्ञात आहे, असें एक वेगळें जगच आहे कीं काय, असें वाटतें. आणि तेणेंकरून मन थक्क होऊन जातें.

पदार्थाचें ज्ञान होण्यास आपणां मानवांस स्पष्ट ज्ञात अशीं पांचच इंद्रियें आहेत. इतर प्राण्यांस कांहीं अधिक आहेत कीं काय कोण जाणे! आह्मांस जें स्थल अगदीं शून्यवत् वाटतें, तें त्यांस कदाचित् रमणीय वाटत असेल! आपणांस जेथें कांहींएक सुंदर दिसत नसेल, तेथें त्यांस नंदनवन दिसत असेल. आपणांस जेथें कांहींएक शब्द ऐकूं येत नसतील, तेथें त्यांस गंधर्वांच्या गायनांप्रमाणें मधुर स्वर ऐकूं येत असतील. आपणांस ज्या औषधी ठाऊक नसतील, त्या त्यांच्या नेहमींच्या प्रचारांत असतील. आपणांला जें बोलायाला दाहा शब्द लागत असतील, तें त्यांस कदाचित् एका शब्दांत बोलतां येत असेल. असें काय काय असेल आणि काय काय नाहीं, ह्याची कल्पना देखील करितां येत नाहीं! पाखरांच्या घरट्यासारखें घरटें मोठ्या चतुर माणसाला तयार करितां येत नाहीं. मधमाशांच्या पोळ्यांतलीं घरें पाहिलीं तर तीं जशीं उत्तम कंपास लावून मोठ्या चातुर्यानें बांधल्यासारखीं दिसतात, तशीं आपणांस करतां येत नाहींत. सारांश, आपणांस येत नाहींत अशा पुष्कळ गोष्टी इतर जीवांस येत आहेत. इतर जीव ही एक अगदीं वेगळी सृष्टि आहे.

प्राणिविद्येचा नाद असतो, ते पुरुष नानाप्रकारचे प्राणी पाळितात, आणि कितीएक प्राण्यांचीं प्रेतें नानाप्रकारच्या युक्तींनीं चांगलीं वाळगून ठेवितात. त्यांपासून उपयोग होत नाहीं असें नाहीं; उपयोग होतो. परंतु, ह्या प्राण्यांची भाषा समजून जो काय उपयोग होणार आहे, तो दुसऱ्या कशानेंही व्हावयाचा नाहीं. तो प्रयत्न केला पाहिजे. प्राणी शब्द करितात, तो उगाच करीत नाहींत. त्याला कांहीं तरी अर्थ





असला पाहिजे. भयाची सूचना शब्दद्वारें झाल्याबरोबर सगळे पक्षी उडून जातात, असें वारंवार दृष्टीस पडतें. शिवाय, त्यांच्या चालीरीतींचें अवलोकन फार बोधप्रद होतें, त्यापासून विलक्षण गोष्टी कळतात. ह्या सगळ्या विचारांचें मनन केलें ह्मणजे असें मनांत येतें कीं, ह्या एकट्या दिशेनें ज्ञानाचा समुद्र केवढा पडला आहे, ह्याचा अंत नाहीं.

बरें, ह्या समुद्राकडे पाहिलें, ह्मणजे हा अपरंपार दिसतो खरा; तरी, एकएक कण आपण त्यांतला घेत आहोंत, हेंही खरें आहे. ह्मणजे, तो मानवशक्तीच्या बाहेर आहे असें नाहीं. साध्य आहे. परिश्रम मात्र केले पाहिजेत.

कण कण मिळूनच हिमालय झाला आहे. आणि ते कण माणसास वेंचतां येत आहेत. तर, कालेंकरून—मग दाहा हजार वर्षांनीं ह्मणाना—ते सगळे कण माणसाच्या हस्तगत होण्याची आशा आहे. हाच प्रकार ज्ञानाचा आहे. ज्ञान अमूर्त आहे. त्यास राहायास जागा लागत नाहीं. जसें ज्ञान अगाध आहे, तसें माणसाचें मनही अगाध आहे. कालेंकरून शरीर वाढेनासें होते, शरीराची वाढ खुंटते, पण, मन वाढेनासें होत नाहीं, मनाची वाढ खुंटत नाहीं, आणखी, एकाच्या देहाची वाढ दुसऱ्याच्या उपयोगीं पडत नाहीं; पण, एकाच्या मनाची वाढ दुसऱ्याच्या उपयोगीं पडते. प्राचीन विद्वानांचे ग्रंथ ही त्यांच्या मनाची वाढ आहे. ती आपल्या उपयोगीं पडत आहे. तींत आपण भर घालण्याचा प्रयत्न करावा, ह्मणजे, हा सगळा सांठा आपल्या पुढच्या पिढ्यांस उपयोगीं पडण्यासारखा होईल. असें परंपरेनें चालणें हीच ज्ञानाची वृद्धि होणें होय.

ही ज्ञानवृद्धि वस्तुगुणधर्माच्याच संबंधाची आहे असें

नाहीं. तिची व्याप्ति सर्व प्रकारच्या चांगल्या अभिवृद्धींत आहे. मूर्त आणि अमूर्त अशा दोन्ही प्रकारच्या सद्गुणवृद्धीचा समावेश तींत होतो. तिलाच आह्मी उन्नति ह्मणतों. आपला माणसांचा अधिकार नुसत्या मूर्त वस्तूंवर चालून उन्नति पुरी व्हावयाची नाहीं; तर तो अमूर्त वस्तूंवरही चालायास पाहिजे. दगड, पाणी, वायु, प्रकाश, उष्णता, विद्युत् ह्यांस आह्मांस आपल्या आज्ञेंत वागविण्याचें सामर्थ्य आलें पाहिजे, त्याप्रमाणें मनास, अंतःकरणास, चित्तवृत्तींस आह्मीं आपल्या कह्यांत आणिलें पाहिजे, आणि त्यांस आपल्या इच्छेप्रमाणें वागायास लाविलें पाहिजे. तेव्हांच आपली खरी आणि पूर्ण उन्नति होईल. त्यांतही एक मोठा भेद आहे. मूर्त वस्तूंवर पुरतें स्वामित्व न मिळालें, त्यांत कांहीं उणें असलें, तर तें कांहीं मोठें व्यंग कोणी समजत नाहींत. परंतु, अमूर्तांवर, चित्तवृत्तींवर, जर स्वामित्व कमी पडलें, जर एकादी वाईट चित्तवृत्ति, एकादे प्रसंगीं अत्यंत उच्छृंखळ होऊन तिच्या योगानें भलतेंच काम हातून घडलें, तर, इतर सगळ्या सद्गुणांची मृत्तिका होऊन जाते. लंकेचा रावण मोठा ज्ञाता होता, त्यानें वेदांचीं खंडें केलीं ह्मणतात. परंतु, त्याचे ठायीं काम प्रबळ झाल्यामुळें त्याच्या सगळ्या गुणांची मृत्तिका झाली. त्याच्या आलीकडचें अगदीं प्रसिद्ध उदाहरण ह्मटलें ह्मणजे पार्नेल ह्याचें होय. असो.

तर, आपली उन्नति, मूर्त आणि अमूर्त, ह्या दोन्ही प्रकारच्या वस्तूंवर स्वामित्व वाढून झाली पाहिजे. ह्मणून, पदार्थांचे गुणधर्म शोधण्याच्या कामीं जसे प्रयत्न होत आहेत, तसे, मनाच्या गुणधर्मांवर अधिकार मिळण्याविषयींही माणसानें अखंड प्रयत्न चालविले पाहिजेत. आणि मनाच्या संबंधाचे जे हे प्रयत्न

आहेत, ते, मनुष्याचे वेगळे वेगळे होत असून, ते, बहुधा ज्याचे त्याच्या उपयोगीं पडत असतात. एकाचा निश्चय दुसऱ्याच्या उपयोगीं पडत नाहीं, एकाची उदारता दुसऱ्याच्या उपयोगीं पडत नाहीं. ह्मणून, ज्या ज्या स्थितीस जे जे गुण भूषणावह ह्मणून थोरांनीं सांगितले आहेत, ते ते गुण, त्या त्या स्थितींत, यथाशक्ति संपादण्याचा उद्योग करणें हें माणसाचें फार मोठें कर्तव्य आहे. आणि ह्यानेंच थोरपणाच्या मार्गांत त्याचें पाऊल पुढें पडत असतें. वामन पंडितांनीं ह्मटलें आहे:—

### श्लोक.

भाग्याला सुजनत्व भूषण असे कीं मौन शौर्यास तें
ज्ञानाला शम त्या श्रुतास विनय द्रव्यास दातृत्व तें
अक्रोधत्व तपा क्षमा प्रभुपणा धर्मास निर्दंभता
या सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्वता.

ह्याचा अर्थ उघड आहे. हे गुण, त्या त्या स्थितींत अंगीं धरून, ते वाढविण्याचा प्रयत्न करवेल तितका करावा. ह्या प्रयत्नांची पूर्णता माणसास असाध्य आहे. हे सगळे गुण पूर्णपणें अंगीं बाणणें हें परम दुष्कर आहे. तथापि, मनुष्यास ह्या लोकीं येऊन, जन्मभर अनंत उपद्व्याप करून जें काय साधावयाचें आहे, तें हेंच आहे कीं, आपल्या पित्यासारखें, आपल्या उत्पन्नकर्त्यासारखें, आपल्या देवासारखें, होववेल तितकें व्हावयाचें आहे. सगळ्या सद्गुणांची पूर्णता हाच देव होय. त्याचीं आपण मुलें आहोंत. तर, त्याचें अनुकरण करून त्याच्यासारखें होववेल तितकें होण्याचा प्रयत्न करावा, हेंच कायतें आपणास करावयाचें आहे. आणखी इतिहास पाहिला,

तर, आजपर्यंत जे कोणी मोठे ह्मणून ह्या पृथ्वीच्या पाठीवर होऊन गेले, ते हेंच करीत होते, असें दिसून येईल.

अशा प्रकारचे प्रयत्न राष्ट्रांत होणें हेंच त्याच्या उन्नतीचें मुख्य साधन होय. आशा मोठी ठेवावी, आणि ती पूर्ण होण्याचा प्रयत्न करावा. आणखी, हा प्रकार जसा ज्ञानसंपादनांत साधतां येतो, तसा कुटुंबव्यवस्थेंतही साधतां येतो. हीं दोन्ही अंगें बरोबर चालतात तेव्हांच राष्ट्रोन्नति होते. सध्यां जीं राष्ट्रें उन्नत झालेलीं आहेत, त्यांजकडे पाहिलें, तर त्यांत हे दोन्ही प्रकारचे उद्योग मोठ्या झपाट्यानें चाललेले दृष्टीस पडतात. नवनवे शोध लागत आहेत, नवनव्या युक्ति निघत आहेत, आणि ज्या गोष्टी पूर्वीं स्वप्नींही नव्हत्या त्या प्रत्यक्ष होत आहेत. त्याप्रमाणेंच कोणत्या लोकांत कोणते गुण विशेष असल्याच्या योगानें त्यांचें कोणतें हित झालें होतें, ग्रीक लोक आणि रोमन लोक जे एवढ्या उन्नतावस्थेप्रत चढले होते, त्यांनीं कोणते गुण संपादिले होते, आणि सध्यां जर्मन, इंग्लिश, अमेरिकन इत्यादि लोक जे श्रेष्ठ झाले आहेत, ते कोणत्या गुणांनीं श्रेष्ठता पावले आहेत, हें पाहून, त्यांचें अनुकरण होत आहे. हा प्रकार मूर्त आणि अमूर्त अशा दोन्ही प्रकारांत चालला आहे. सुखावह गोष्टी वाढत जात आहेत, आणि कुटुंबें अधिकाधिक सुखी होत आहेत. असें आमच्या ह्या राष्ट्रांत झालें पाहिजे. सज्ञानतेच्या संबंधानें, आपण सर्वांनीं, श्रेष्ठ होण्याची आशा धरून, एक एक पायरी वर जाण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मनुष्य श्रीमंत असो वा गरीब असो, मोठा असो वा लहान असो, मोठा पंडित असो वा अडाणी असो, त्याला वरची पायरी ह्मणून कांहीं तरी असावयाची, ती त्याला कळत असावयाची, आणि त्यानें,

तिजवर जाऊन बसण्याचा प्रयत्न करावा, त्या पायरीवर जाण्याची आशा मनांत दृढ धरावी, हाच सगळ्या उद्योगाचा जीव असावा. हा जीव, माणसांमाणसांत असतां असतां राष्ट्रांराष्ट्रांत यावा, आणि त्यांची सिद्धि व्हावी, हीच आशेच्या आशेची सफलता होय. ही हातीं लागण्यास कायावाचामनें- करून झटवेल तितकें झटलें पाहिजे. शेक्सपियर ह्या नामांकित कवीनें ह्मटलें आहेः—“मनुष्य हा काय उत्तम पदार्थ आहे! तो किती तरी थोर विचाराचा आहे! त्याची बुद्धि किती तरी अगाध आहे!” खरें आहे. “नर करणी करे तो नरका नारायण होय.” करणी मात्र केली पाहिजे.

उन्नतीची पूर्णावस्था ह्मणजे काय? स्वर्गसुख ह्मणून जें सांगितलेलें आहे ती होय. अंगांत सगळे सद्गुण असावे; दुर्गुणाचें नांव नसावें; मनकामना सहज पूर्ण व्हाव्या; कोणाचे ठायीं उदासीनता असूं नये; जिकडे तिकडे निरंतर आनंद असावा; दुःखाचा लेश कोठें आढळूं नये; आणि सगळीं माणसें प्रेमवंत आणि भक्तिमान् मुलांसारखीं निरंतर परस्परांशीं वागावीं; ही उन्नतीची पूर्णता होय. आह्मी ह्मणतों कीं हाच स्वर्गलोक होय!

हा स्वर्गलोक बांधण्यास माझ्या एकट्याच्या प्रयत्नानें काय होणार आहे, असें कोणीं ह्मणूं नये. कोणीही माणूस एकटा नाहीं, समाजापासून तुटून नाहीं, वेगळा नाहीं. तो कोणत्या तरी समाजाचा एक अवयव आहे. अवयवांत शक्ति आली असतां ती, अंशतः सगळ्या देहास ह्मणजे समाजास तेवढी शक्ति येते. अशी सगळ्या अवयवांस शक्ति आली ह्मणजे सगळ्या शरीरास ह्मणजे सगळ्या राष्ट्रास मोठी बळकटी येते. आणखी, जानस्टुअर्ट मिल

ह्यांनीं ह्मटलें आहे कीं, "जीव ही कांहीं थट्टा नव्हे". तो जीव कोणाचाही असो, राजाचा असो कीं रंकाचा असो, जीव ह्मटला ह्मणजे सर्वांची योग्यता सारखी आहे. शिवाजी महाराजांच्या जीवानें राज्य स्थापिलें. समर्थांच्या जीवानें परमार्थ दाखविला. एका माणसास आपल्या जीवाचा जसा उपयोग करितां येतो, तसा दुसऱ्या कोणत्याही माणसास आपल्या जीवाचा उपयोग करतां येण्यासारखा असतो. त्यांत कालदेशवर्तमानानुरोधानें कांहीं अंतर पडणारच आहे. परंतु, एकंदरींत जीवाच्या सार्थक्याच्या मानानें फल सारखेंच असावयाचें आहे. तें सार्थक्य यथाशक्ति करावें, हेंच माणसाचें मुख्य कर्तव्य आहे.



# २२.

## इतिकर्तव्यता.



जन्मास येऊन करावयाचें काय, हा एक फार मोठा प्रश्न आहे. ह्याची व्याप्ति फार मोठी आहे. ज्याला ह्मणून थोडेंबहुत कळतें आहे, त्याच्या मागें हा प्रश्न आहेच, मग तो राजा असो कीं रंक असो. ह्या प्रश्नाचें उत्तर, मूर्तिमंत एक असें कधीं यावयाचें नाहीं. आकृति तितक्या प्रकृति आहेत. ह्याकरितां ह्या प्रश्नांचीं उत्तरें वेगळ्या वेगळ्या माणसांकडून वेगळीं वेगळीं यावयाचीं आहेत, हें अगदीं खचीत आहे. तरी, त्या सर्वांत तत्व एक असावयाचें आहे, ह्यांत संशय नाहीं. तें तत्व हें कीं, सत्कृत्यें करणें हीच माणसाच्या जीविताची इतिकर्तव्यता आहे.

परंतु, प्रपंचांतली माया फार विलक्षण आहे. ती त्या तत्वास एकीकडे गुंडाळून ठेवून आपलें घोडें पुढें ढकलिते, आणि माणसास नानाप्रकारच्या मोहांत पाडिते. त्यामुळें त्याच्या हातून अनन्वित कर्में होतात, आणि त्यांच्या पायीं त्याचा नाश होतो. रावण, दुर्योधन, कीचक, शिकंदर, ब्रूटस, सीझर, राघोबादादा, इत्यादि सहस्त्रावधि उदाहरणें जगाच्या इतिहासांत आहेत. त्यांवरून स्पष्ट दिसतें आहे कीं, कनककांतादिकांत जें काय परमसुख आहे असें वाटत असतें, तें सगळें खोटें असतें—मायावी असतें—नाशमूलक असतें. त्याची आशा कधीं करूं नये. तर, सत्कृत्यांत जें काय सुख आहे—ज्या सुखाच्या योगानें तुकाराम, रामदास, साक्रेटिस इत्यादि-

कांच्या आत्म्यांस परमसंतोष झाला आहे, ज्याच्या आदि-पश्चात् दुःखाचा लेशही नसतो—तें सुख मिळविण्याच्या प्रयत्नांत आयुष्य घालविणें हीच इतिकर्तव्यता आहे.

नाटकांत नानाप्रकारचे वेष घेऊन मनुष्यें रंगभूमीवर येतात, आणि वेषानुरूप आपलीं कामें करितात. त्यांत जो कोणी आपलें काम उत्तम करितो—मग तें रंभेचें असो किंवा ह्माराचें असो—त्यालाच प्रेक्षक शाबास शाबास ह्मणतात. तसेंच थोडेंसें ह्या प्रपंचांतलें आहे. मनुष्य प्रपंचांत पडल्यावर त्याजकडे अनेक अधिकार येतात—ह्मणजे ते तितके वेषच ह्मणायाचे. मनुष्य कोणाचा मुलगा होतो, कोणाचा बाप होतो, कोणाचा नवरा होतो, कोणाचा भाचा होतो, कोणाचा मामा होतो, कोणाचा धनी होतो, कोणाचा चाकर होतो, कोणाचा राजा होतो, कोणाची प्रजा होतो, कोणाचा धनको होतो, कोणाचा ऋणको होतो, कोणाचा गुरु होतो, कोणाचा शिष्य होतो, असे अनेक अधिकार त्याला प्राप्त होतात, आणि ह्या अधिकारांच्या संबंधाचीं कर्तव्यें, कालमाहात्म्येंकरून आणि स्थलमाहात्म्येंकरून, वेगळ्या वेगळ्या प्रकारचीं असतात. तीं चांगल्या प्रकारें बजावण्यास अनेक प्रकारचे गुण लागतात. आज्ञाधारकता लागते, दुसऱ्यांस स्वाधीन ठेवण्याचें सामर्थ्य लागतें, सोशिकपणा लागतो, उदारता लागते, नेमस्तपणा लागतो, स्वदेशाभिमान लागतो, निर्लोभता लागते, आत्मसंयमन लागतें, पवित्रता लागते, असे आणखी पुष्कळ गुण लागतात. इतके गुण अंगीं धारण करावे, तेव्हां तीं कर्तव्यें यथार्थ रीतीनें करतां यावयाचीं आहेत; आणि तीं करतां आलीं ह्मणजे आपल्या जीविताची इतिकर्तव्यता झाली, असें व्हाव-

याचें आहे. तेव्हां, आपलीं कर्तव्यें यथासांग करणें हें किती अवघड आहे, ह्याची कल्पना सहज करितां येण्यासारखी आहे.

हें जरी इतकें अवघड आहे, तरी, तें केलें पाहिजे. तें कोणास चुकवितां यावयाचें नाहीं. आणि जे कोणी तें चुकविण्याचा प्रयत्न करितात, ते परिणामीं दुःखास आणि शोकास पात्र होतात. ह्याचींही उदाहरणें इतिहासांत सहस्रशः आहेत. बरें ही इतिकर्तव्यता करण्यास जे हे अनेक गुण लागतात, ते अंगीं आणावे कसे, असें एकाद्यास मोठें संकट वाटेल. परंतु, तें कांहीं एवढें मोठें संकट नाहीं. प्रयत्न केला असतां, स्थितिपरत्वें ते गुण, पूर्णपणें नव्हत, परंतु कार्यापुरते—मनुष्यास प्राप्त होतात. निदान, ते संपादवतील तितके संपादणें ह्यांतच त्याची इतिकर्तव्यता होते, आणि तो स्तुतिस्तोत्रास पात्र होतो. मुंगी कांहीं दाहा पांच खंडींचें ओझें उचलीत नाहीं; एक दाणाच उचलिते; पण तो तिच्या जीवाच्या मानानें भारी असतो, ह्मणून लोक तिला शाबास शाबास ह्मणतात. ह्याच न्यायानें, प्रपंचांतली इतिकर्तव्यता साधायास जे गुण आवश्यक आहेत, त्यांतले साधतील तितके माणसानें साधावे, ह्मणजे झालें. धर्मराजास कधीं राग येत नसे असें नाहीं. अर्जुन कर्णास न वधितां तसाच परत आला, ह्मणून त्याला तो इतकें कठोर बोलला कीं, अर्जुन त्याला ठार मारायाला तयार झाला होता! तरी, धर्मराजा हा क्षमेची मूर्ति होता, ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे.

तर, मनुष्यास प्रपंचामध्यें जे अनेक अधिकार प्राप्त होतात, त्या अधिकारांच्या संबंधांचीं सगळीं कार्यें यथास्थितपणें करणें हीच काय ती त्याची इतिकर्तव्यता आहे. ह्मणजे, मनुष्यानें

आपलें कर्तव्य करावें, हेंच त्याच्या जन्माचें सार्थक्य आहे. आणखी, कर्तव्य जरी आपल्या मनाप्रमाणें पूर्ण झालें नाहीं, तें पूर्ण करायास कायावाचामनेंकरून झटणें हेंच त्याचें पूर्णत्व आहे.

कोणाच्या तोंडांतून कधीं कधीं असें ऐकूं येतें कीं, कांहीं केलें तरी मरायाचें आहे, मरण चुकत नाहीं, मग उगाच एवढा उपद्व्याप कां करावा ? उगाच देहाला श्रम कां द्यावे ? हें बोलणें अगदीं अज्ञानमूलक आहे. हाच प्रश्न उलट प्रकारें आह्मी असा विचारितों कीं, जर केव्हां तरी मरावयाचें आहे, आणि ह्या देहाचा नाश व्हावयाचा आहे, तर, त्याचा उपयोग जगाच्या कल्याणाकडे कां न करावा ? उत्तम पदार्थांनीं भरलेलें पात्र आपणांजवळ आहे, तें तसेंच राहूं दिलें तर, तें नासून नाहींसें होणार आहे, आणि कोणास खायास घातलें तरी सरणार आहे; दोन्ही प्रकारीं तें नष्ट होणार आहे, हें खरें आहे. पण ह्यांतला चांगला प्रकार कोणता ? ग्रंथकारांनीं ग्रंथ लिहिले नसते, साक्रेटिसतुकारामासारख्यांनीं उपदेश केला नसता, कोलंबसानें अमेरिका शोधून काढिली नसती, काक्स्टन ह्यानें छापण्याची युक्ति काढिली नसती, सर ऐझाक न्यूटनानें गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढिला नसता, आणि एडिसन ह्यानें विजेचे दिवे तयार केले नसते, तर ह्मणजे हें जग चाललें नसतें असें नाहीं. त्याप्रमाणेंच माणसांनीं आपलीं कर्तव्यें यथास्थितपणें केलीं नाहींत, तर जगाचें कांहीं अडावयाचें नाहीं. जग कसें तरी चालेल. परंतु, कदन्नानें पोट भरणें आणि सदन्नानें पोट भरणें ह्यांत जें अंतर आहे, तें अंतर त्यांत राहील.

आणखी असें आहे कीं, परमेश्वरानें आपणांस जो हा जीव दिला आहे, तो उगाच व्यर्थ घालविण्याकरितां दिला नाहीं.

जन्मास येणें आणि मरणें ही कांहीं थट्टा नाहीं. ह्यांत कांहीं तरी हेतु आहे. आपण आपला नौकर बाजारांत उगाच पाठवीत नाहीं, कांहीं काम योजून पाठवितों. त्याप्रमाणें देवानें आपणांस ह्या जगामध्यें उगाच, निष्कारण पाठविलें नाहीं; कांहीं तरी कार्य आपले हातून व्हावें ह्मणून पाठविलें आहे. तें कार्य प्रत्यक्ष येऊन कोणी सांगत नाहीं. परंतु, साहित्यावरून त्याची कल्पना आपणांस करितां येते. विचार आणि ज्ञानशक्ति देवानें आपणांस दिली आहे, तिच्या योगानें बरेंवाईट आपणांस कळत आहे. त्यांतलें बरें तेवढें आपण करावें–तें करवेल तितकें करावें–करवेल तेथें करावें–आणि करवेल तेव्हां करावें–ह्मणजे आपण आपल्या जनकाचे उतराई झालों, असें होईल. आठ वर्षांच्या मुलानें शाळेंत जावें, वीस वर्षांच्या मुलानें मोठ्या विद्या शिकण्याचा प्रयत्न करावा, तीसपसतीस वर्षांच्या मुलानें प्रपंच हांकावा, असें बापास वाटत असतें. आठ वर्षांच्या मुलास तो प्रपंच हांकायास सांगत नाहीं. त्याप्रमाणें, ज्याचे ठायीं जीं साधनें दिलेलीं असतात, त्यानें त्या साधनांनीं आपलें कर्तव्य करवेल तितकें करावें, अशी देवाची इच्छा आहे. तीं साधनें तरी निरंतर अखेरपर्यंत माणसाच्या हातीं असतातच, असा नेम नाहीं. प्रत्येकाच्या मागें त्याची व्याधि आहेच.

श्लोक.

मृत्यूनें जननास वार्धकपणें कीं यौवनें रोखिलें<br>
लोभें आक्रमिली स्वतुष्टि वनिता मोहें शमा व्यापिलें<br>
मात्सर्यें सुगुणा वना फणिकुळें पृथ्वीपतीला खलें<br>
अस्थैर्यें विभवास सांग कवणें कोणास न ग्रासिलें.

वामन.

ह्याकरितां, त्या साधनांचा उपयोग करवेल तितका लवकर केला पाहिजे. नाहींतर पश्चात्तापास कारण होतें. फार काय सांगावें, प्रत्यक्ष शत्रु मेला तर सज्जनांस वाईट वाटतें; कां कीं, त्याच्या योगानें क्षमा करायाचें एक उत्तम ठिकाण नाहींसें होतें.

पृथ्वीची उन्नति परमेश्वरानें माणसाच्या हातीं ठेविली आहे. त्या उन्नतीची मर्यादा अतर्क्य आहे. स्वर्गाविषयीं जी कल्पना आहे, त्या कल्पनेप्रमाणें पृथ्वीचें श्रेष्ठत्व वाढावें, ही उन्नतीची परमावधि होय. ही उन्नति करण्यास सगळ्या माणसांनीं—मग त्यांची योग्यता कोणत्याही प्रकारची असो—हातभार लाविला पाहिजे. गुरूनीं आपल्या छात्रांस सद्विद्या पढविली पाहिजे; आयांनीं आपल्या मुलांचें लालनपालन केलें पाहिजे; राजांनीं प्रजांचें रक्षण केलें पाहिजे; आणि इत्तर माणसांनीं आपापलीं कर्तव्यें यथाशक्ति केलीं पाहिजेत. ह्मणजे, वृक्ष जसा हळू हळू वाढत जातो, तशी देशोन्नति हळू हळू वाढत जाईल, आणि पृथ्वी हा प्रतिस्वर्ग होईल. आणखी, सगळ्या ज्ञानाचें मुख्य पर्यवसान हेंच आहे.

अशी उन्नति—मग ती कितीकां अल्प असेना—ज्याचे हातून कोणत्याही पर्यायानें होत नाहीं, त्याविषयीं ह्मटलें आहेः—

**श्लोक.**

उपजणें मरणें न चुके नरा<br>
फिरत नित्य असे भवभोंवरा<br>
उपजला तरि तोचि मला गमे<br>
कुलसमुन्नति ज्यास्तव घे रमे.

वामन.

कुलसमुन्नति हा राष्ट्रोन्नतीचा एक लहानसा अंश आहे.

ह्मणून जो कोणी कुलोन्नति करितो, त्यास, परंपरया, राष्ट्रोन्नति केल्याचें पुण्य लागतें.

मनूनें एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, “ मनुष्य ह्या जगांत जसा एकटा येतो, तसा तो ह्या जगांतून एकटा जातो; त्याला आपल्या पुण्याचें सुख एकट्याला भोगायाला सांपडतें; तसें पापांबद्दलचें दुःखही एकट्याला भोगावें लागतें. तो मरतो, तेव्हां त्याचा देह मोडून पडलेल्या वृक्षाप्रमाणें इहलोकीं राहातो, आणि त्याचीं पापपुण्यें त्याच्या आत्म्याच्या बरोबर जातात. ह्मणून माणसानें पुण्यसंग्रह करावा; ह्मणजे तो त्याला परलोकीं उपयोगीं पडेल.”

खरें आहे. पण पुण्य ह्मणजे काय ? पुण्य ह्मणजे चांगल्या स्वकर्तव्याचें फल होय. आणि चांगलें कर्तव्य ह्मणजे, ज्यांत कोणाचें अहित नाहीं, आणि होतें तें सगळें हितच आहे, असें जें कर्म तें होय. एवढें सांगणें बस आहे. आणखी सत्कर्माची व्याख्या साधारणपणें आबालवृद्धांस ज्ञात असते. अमकें एक कर्म चांगलें किंवा वाईट ह्याविषयीं कधीं कोणास शंका येत नाहीं. तेव्हां, चांगलें कर्म करणें हेंच काय तें माणसाचें कर्तव्य होय. तीच इतिकर्तव्यता जाणावी.

ही इतिकर्तव्यता करवेल तितकी पावलोपावलीं करावी. वेळ गमावूं नये. जन्म, बालपण, प्रौढपण, वृद्धापकाल, आणि मृत्यु अशा पायऱ्या प्राण्याच्या आयुष्यक्रमांत आहेत खऱ्या. परंतु, ह्या सगळ्या पायऱ्यांवर पाय ठेवण्याचें दैव सर्वांचें असत नाहीं. अगदीं चुकावयाच्या नाहींत, अशा ह्यांतल्या दोन मात्र पायऱ्या आहेत. त्यांवर प्रत्येक जीवाचें पाऊल पडतेंच पडतें. त्या दोन पायऱ्या ह्मटल्या ह्मणजे एक पहिली आणि एक शे-

वटची होय; जन्म आणि मृत्यु. ह्यांतल्या पहिल्या पायरीविषयीं माणसास मुळींच भान नसतें. तिजवर त्याचा पाय केव्हां पडतो, हें त्याला कळतही नाहीं. परंतु, प्रौढपणाच्या पायरीवर पाय ठेविल्यावर मृत्यूच्या पायरीविषयीं त्याच्या मनास विचार सुचतात. आणि त्याविषयीं त्याचे मनांत नानाप्रकारचे तरंग येतात. मोठमोठ्यांनीं ह्याविषयीं खोल विचार केले आहेत.

सिसरोनें ह्मटलें आहेः—"वृद्धापकाल दुःखद वाटण्यास मला चार कारणें दिसतात. पहिलें कारण हें कीं, मनुष्य कामाकाजाच्या उपयोगीं नाहींसा होतो; दुसरें कारण हें कीं, शरीरास अशक्तता येते; तिसरें कारण हें कीं, मनाच्या सगळ्या शक्ति आंखडतात; आणि चवथें कारण हें कीं, मृत्यु अगदीं जवळ येऊन ठेपल्यासारखा दिसतो." ह्यांतलें चौथें कारण फार विचार करण्यासारखें आहे. कां कीं, मृत्यु हा जरी क्रमानें वार्धक्याच्या पुढें घातला आहे, तरी, तो मध्यंतरीं केव्हां कोठें येईल ह्याचा नेम नाहीं. कदाचित् जन्म झाल्याबरोबरही येईल. ह्मणून प्रपंचांत त्याविषयीं सावध असावें. मृत्यु जवळ आला आहे, असें समजून आपलें कर्तव्य करीत असावें, हें उत्तम आहे.

मृत्यु हा एके प्रकारीं फार चांगला आहे. एका तत्त्ववेत्त्याचें ह्मणणें आहे कीं, "मृत्यु ही एक मोठी शांति आहे." खरेंच आहे. प्रपंचाचा प्रवास करितां करितां अतिशयित दमलेल्या प्रवाशास मृत्यु हें खरोखरच विश्रांतिस्थान आहे. नुसते हस्तपादादिकांचे व्यापार बंद ठेवून स्वस्थ बसल्यानें श्रमिताला जर इतकें सुख होत आहे—इतकी शांति वाटत आहे—तर, सगळ्या इंद्रियांचे सगळे व्यापार अगदीं थांबल्यावर त्यास किती शांति वाटावी बरें !

रोगानें देहास वेदना होतात, पण प्राण जातांना वेदना होत नाहींत. पुष्कळ माणसें, बोलतां बोलतां, कांहींएक वेदना न होतां, मेलेलीं पाहण्यांत आलीं आहेत. प्लेटो हा लिहीत असतां मरण पावला. ल्यूकन हा आपली कविता ह्मणत असतां मरण पावला. लढाईंत पडलेल्या लोकांविषयीं देखील असें सांगतात कीं, त्यांस जखमांच्या मात्र कायत्या वेदना होत असतात; प्राण जाण्याच्या वेदना मुळींच होत नाहींत; कां कीं त्यांत मुळींच वेदना नाहींत.

होय. अशा प्रकारें मरण आलें, ह्मणजे पुढें काय होतें, हा मोठा विचार आहे. कोणी ह्मणतात पुनर्जन्म आहे, कोणी ह्मणतात पुनर्जन्म नाहीं. कोणी ह्मणतात मरणोत्तर जीवास देवासमोर जावें लागेल. कोणी ह्मणतात, मेल्याबरोबर तत्वास तत्व मिळून जातें, देव नाहीं ना कांहीं नाहीं. ह्यांतलें अमकें एक खरें आहे, असें कोणालाही सप्रमाण सिद्ध करितां येत नाहीं. तर आतां चालावें कसें ? ह्याचा उलगडा होण्यास एक साधारण उदाहरण घेऊं. एक अंधारी गल्ली आहे, तींत इतका अंधेर आहे कीं, तींत कांहींएक दिसत नाहीं. तिजविषयीं कोणी असें सांगतात कीं, तींत अतिशयित कांटे आहेत; आणि कोणी ह्मणतात कीं, तींत कांटे मुळींच नाहींत. तर, त्या वाटेनें जोडा घालून सावधगिरीनें जावें हा प्रकार उत्तम आहे. ह्मणजे, कांटे असलेच, तर ते लागूं नयेत; आणि नसले, तर जोडा घातल्यापासून कांहीं हानि होत नाहीं. तसें, देव आणि धर्म हे आहेत–खरे आहेत–असें समजून नित्य चालावें, हा उत्तम मार्ग आहे. त्यांत कांहीं हानि नाहीं. आणखी जे कोणी देव

नाहीं असें समजतात, त्यांविषयीं अशी एक गोष्ट प्रसिद्ध आहे कीं, ते तें नास्तिकपण दुसऱ्यांस शिकवीत नाहींत; ह्याचें कारण असें आहे कीं, तें जर खरोखर नाशकारक असलें, तर त्यापासून, आपल्यामुळें, दुसऱ्यांस बाधा होऊं नये, असें त्यांस वाटत असतें.

मृत्यु हें एक मोठें अरिष्ट आहे, असें कितीएकांस वाटतें. पण ज्ञानवंतांस तसें वाटत नाहीं. सिसरोनें ह्मटलें आहे कीं, सृष्टींतल्या झाडून साऱ्या वस्तूंस जर अंत आहे, तर माणसाच्या आयुष्यालाही तो असला पाहिजे. "ह्मातारपण हें मनुष्यांस; खेळून खेळून एकादें मूल थकावें, तसें आहे. तर त्यांस विश्रांति अवश्य पाहिजे. ती मृत्यूशिवाय दुसऱ्या कशांत मिळणार ?" ह्याप्रमाणेंच साक्रेटिसानें, आपल्या चौकशीच्या वेळीं ह्मटलें कीं, " कोणत्याही प्रकारें पहा, मृत्यु हा सुखावह आहे. मृत्यु ही महानिद्रा आहे, असें जे कोणी ह्मणतात, त्यांचें जर खरें मानलें, तर, त्यांत काय वाईट आहे ? गाढमूढ झोंप लागणें, तींत कांहींएक त्रास नसणें, ही स्थिति किती सुखावह आहे, हें नेहमींच्या निद्रेवरून सर्वांस ठाऊक आहे. आणि मृत्यु ही अशा प्रकारची निद्रा अनंतकाळची आहे. तेव्हां तिजपेक्षां मोठा लाभ तो कोणता ह्मणावयाचा ? अथवा, मृत्यु हें परलोकाचें द्वार आहे, त्या लोकीं सगळ्या मृतांच्या गांठी पडावयाच्या आहेत, असें जें ज्ञानवंतांचें मत आहे, तें खरें मानून चाललों, ह्मणजे मग तर त्यांत फार मौज आहे. तेथें आपल्या सगळ्या मृत जिवलगांच्या गांठी पडावयाच्या आहेत, असें जर आहे, तर, त्यापेक्षां अधिक मोठें सुख तें कोणतें इच्छावयाचें ?" खरें आहे. त्याप्रमाणेंच, कोणाचें मत असें आहे कीं,





मृत्यूनंतर पुनः जन्म घ्यावा लागतो. त्याविषयींही कांहीं साधूंचें ह्मणणें असें आहे कीं, ही मोठी देवाची कृपा आहे. कांकीं, त्याच्या योगानें, जुनें झालेलें भांडें, हा जीर्ण देह जाऊन, नवें भांडें, चांगलें नवें शरीर प्राप्त होतें, आणि त्या जन्मामध्यें, तो मनुष्यजन्म असला ह्मणजे, सहवासानें पुण्यकर्में करितां येतात. अशा कोणत्याही प्रकारें पाहिलें तरी मृत्यु चांगला आहे.

शिवाय, मृत्यु हा हातीं नाहीं, हें फार चांगलें आहे. तुला मृत्यु कसा पाहिजे आणि तो केव्हां पाहिजे, हें जर माणसाला विचारिलें, तर, त्याला ठाम असें उत्तर देतां यावयाचें नाहीं. त्यांत इतके वायदे होतील कीं, त्याला कांहीं सीमा नाहीं. आणखी, मनुष्याच्या जन्माचा सगळा घोंटाळा होऊन जाईल. ह्मणून व्यवस्था आहे ती ठीक आहे.

आणखी, मृत्यु आहे, ही एक मोठी सोय आहे. मनुष्याला आपलीं माणसें कधीं नकोतशीं होत नाहींत. त्यांचा लोभ सुटत नाहीं. अशीं सगळीं माणसें ठेवण्याचें जर हातीं असतें, तर तो लोभ कधीं सरला नसता, आणि माणसांस बसावयास देखील ही पृथ्वी पुरली नसती. मग त्यांच्या निर्वाहाची तजवीज कशी काय लागली असती कोण जाणे. कोणी सुज्ञ मित्र ह्मणतो कीं, “अशीं माणसें जर ठेवतां आलीं असतीं, तर घरांत त्यांनीं खोल्यांच्या खोल्या भरल्या असत्या, त्यांची अतिशयित अडचण झाली असती, त्यांची ओळख देखील राहिली नसती, आणि त्यांचे आणि इतर माणसांचे अतिशयित हाल झाले असते.” खोटें नव्हे.

केवळ ऐहिक विचारानें पाहिला तरी, मृत्यु फार उपयोगी आहे. जुनीं माणसें मेलीं आहेत, ह्मणून नव्या माणसांस राहा-

ण्यास जागा रिकामी झाली आहे. झाडें मेलीं आहेत ह्मणून त्यांचीं लांकडें घरें बांधण्याच्या वगैरे कामीं उपयोगीं पडलीं आहेत. जनावरें मेलीं आहेत, ह्मणून त्यांचीं कातडीं व हाडें हीं जोडे, फण्या वगैरे करण्यास उपयोगीं पडलीं आहेत.

असो. तर माणसास मरणें आहे. तें चुकवितां येत नाहीं. तर मग, तें येईपर्यंत आपणाच्यानें जें काय चांगलें करवेल तें, जेव्हां करवेल तेव्हां, जेथें करवेल तेथें, आणि जितकें करवेल तितकें करणें हें आपलें अत्यंत आवश्यक कर्तव्य आहे. हें चांगलें करणें काया, वाचा आणि मन ह्या तीन साधनांनीं करतां येतें. कोणास ओझें उचलायास लागणें, चालवत नाहीं त्यास हात देणें इत्यादि कामें कायेनें करितां येतात. सत्य भाषण करणें, गोड बोलणें, दुसऱ्याच्या दुःखाचें सांत्वन करणें, परमेश्वरप्रार्थना करून इतरांचीं मनें तिजकडे लावणें इत्यादि चांगलीं कामें वाचेनें करितां येतात. आणखी, अंतःकरण शुद्ध ठेवणें, चांगल्या विचारांचा संग्रह करणें, सद्गुणांवर निष्ठा ठेवून त्यांची वृद्धि करून, त्यांचा प्रभाव आपल्या आचरणावर चांगला राहील असा करणें, आणि तद्द्वारा जनांस सन्मार्गगामी करणें इत्यादि कामें मनानें करितां येतात. अशा प्रकारें, आपलीं, काया, वाचा आणि मन हीं लाववतील तितकीं सत्कार्यीं लावावीं, हीच जन्माची इतिकर्तव्यता आहे.



